अभिनव ग्रंथ माला पुष्प ७ वें.

पुरातत्त्वभूषण

# कै. इतिहासाचार्य राजवाडे यांचें चरित्र.



लेखक:—

पांडुरंग सदाशिव साने, एम्. ए.

( ना. गोखले व ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या चरित्रांचे कर्ते. )



प्रस्तावनाकार—

प्रो दत्तो वामन पोतदार, एम्. ए.

न्यू पूना कॉलेज, पुणें.



संपादक व प्रकाशक—

श्रीधर नारायण हुद्दार, बी. ए. ( टिळक )



| प्रथमावृत्ति | जून १९२८ | किंमत |
|---|---|---|
| प्रती २०००. | जेष्ठ १८५० | १० आणे. |

# अनुक्रमणिका.



संपादकीय, लेखकाचे दोन शब्द, प्रस्तावना.

पृष्ठसंख्या.





# प्रस्तावना.



माझे प्रिय शिष्य रा. साने यांनीं थोर पुरुषांचीं चरित्रें लिहून प्रसिद्ध करण्याचें मोठें स्तुत्य कार्य चालविलें आहे. त्यांच्या गोखले चारित्राचा पुरस्कार करण्याचा मान त्यांनीं मला दिला. त्यानंतर ईश्वरचंद्र विद्यासागर यांचें चरित्र त्यांनीं प्रसिद्ध केलें; आणि आज राजवाडे यांचें चारित्र ते प्रसिद्ध करीत आहेत. चारित्र लेखनाचें कार्य राष्ट्रशिक्षणास अत्यंत उपयुक्त आहे आणि रा. साने यांनीं या शाखेंत सालोसाल भर टाकण्याचें ठरविलें आहे. याबद्दल त्यांचें करावें तवढें कौतुक थोडें होईल !

रानडे, लोकहितवादी अशांसारख्या थोर महाराष्ट्रीयांचीं जरा विस्तृत चरित्रें त्यांच्या मृत्यूनंतर कैक वर्षांनीं प्रसिद्ध झालीं. गोखले यांचें साने यांनीं लिहिलेलेंच चरित्र सर्वांत मोठें आहे. टिळकांचें चरित्र त्यांच्या मृत्यूनंतर काळ न दवडतां ताबडतोब लिहिण्याचें हातीं घेऊन रा. केळकर यांनीं उत्तर भाग ओढून काढून कां होईना पुरें करून टाकिलें आहे. याचा अर्थ स्पष्ट असा होतो कीं राष्ट्र जागें झालें आहे, थोर पुरुषांची योग्यता त्यास समजूं लागली आहे, त्यांची आठवण बुजूं नये आणि पुढील पिढीस त्यांची कामगिरी सविस्तर समजावी म्हणून त्यांचीं चरित्रें प्रसिद्ध होऊं लागलीं आहेत. खुद्द थोर पुरुषांचे शिष्य वा सांप्रदायिक यांनीं वास्तविक हें चरित्र लेखनाचें कार्य करावयास हवे, परंतु त्यांनीं तें वेळेवर केलें नाहीं तरी रा. साने यांचेसारखे उत्साही तरुण

ती उणीव भरून काढण्यास पुढें येत आहेत ही फार समाधानाची गोष्ट आहे.

राजवाडे यांना मी प्रथम शके १८१७।१८ (इ. स. १८९५–९६) मध्यें पाहिलें. त्या वेळी मी लहान होतों आणि राजवाडे यांचें पहिल्या खंडाचें काम चालू होतें. **त्याचा पहिला खंड हा मी वाचलेला पहिला मराठी ग्रंथ होय.** यांतील विषय कळण्याजोगें माझें वय नव्हतें; तथापि त्यांनीं आमचे इतिहासाची माहिती कोठ कोठें मिळेल त्या स्थळांची जी यादी (पहिला खंड, प्रस्तावना) दिली आहे, ती पाहून माझे मनावर विलक्षण परिणाम झाला आणि त्या वेळेपासून या कामाची गोडी मला लागली. हा अंकुर वाढीस लागून इ. स. १९०८ सालीं विजयानंद नाटकगृहांत जें ग्रंथकारांचें संमेलन भरलें होतें, त्यावेळीं मी राजवाडे यांस **घरीं**—आमचे वडील राजवाडे यांचे सहाध्यायी होते—आग्रहानें बोलावून नेलें. त्यानंतर १९१० त भारत इतिहास संशोधक मंडळाची स्थापना राजवाडे यांनीं मेहेंदळे यांच्या साह्यानें केली; किंबहुना त्या स्थापनेच्या दिवशीं—आषाढ शुद्ध १ शके १८३२ रोजी राजवाडे आमच्या घरूनच सभेस गेले ! असो.

अशा या गोष्टी आतां **आठवणी** झाल्या. त्याप्रमाणेंच त्यांचे सहाध्यायी, सहकारी, विरोधक, शिष्य, मित्र, ग्रंथाभ्यासिक या सर्वांच्या आठवणीहि पुष्कळ अजून प्रसिद्ध व्हावयास पाहिजेत. तसेंच त्यांचा इतरांशीं व इतरांचा त्यांशीं झालेला पत्रव्यवहार, त्यांचे अप्रसिद्ध लेख व संग्रह या सर्वांचें अवलोकन त्यांच्या चरित्र लेखकास अवश्य आहे. असा योग येईल तेव्हां राजवाडे

यांचें सांगोपांग चरित्र हातीं घेतां येईल.

रा. साने यांचा प्रयत्न त्या दृष्टीचा नाहीं. साधारण बहुश्रुत वाचकास राजवाडे यांच्या योग्यतेची ओळख व्हावी म्हणून हा प्रयत्न त्यांनीं केला आहे. अशी या सानेकृत चरित्रसिद्धीची मर्यादा आहे. हें लक्षांत ठेवूनच त्यांच्या ग्रंथाकडे पाहिलें पाहिजे.

या ग्रंथावरून राजवाडे यांची कांहींशी ओळख जरी वाचकांस होईल तरी त्यांची खरी आणि पक्की ओळख त्यांच्या लेखांच्या व कार्याच्या परिशीलनानेंच होणार आहे. राजवाडे यांच्या मृत्यूनंतर त्यांच्याविषयीं ज्या आख्यायिका व आठवणी प्रसिद्ध झाल्या आहेत त्यांतही चुकीची माहिती व भ्रामक अनुमानें आलेलीं आहेत. उदाहरणार्थ राजवाडे यांच्या बंधूंकडून राजवाडे यांस चुलतीकडून आलेली किंवा अन्य मदत मिळत असे त्यामुळें त्यांनीं उपासतापास काढून मोठा स्वार्थत्याग केला व हाल काढले हा प्रवाद खोटा दिसतो असा एक निष्कर्ष राजवाडे यांस न पाहिलेल्या एका गृहस्थानें कोणाकडून आलेल्या ऐकीव माहितीच्या आधारें एका वर्तमानपत्रांत प्रसिद्ध केल्याचें मी वाचलें ! चुलतीच्या मत्तेचा वांटा चुलती मेल्यावर राजवाडे यांचेकडे यावयाचा होता, व तो त्यांचे सुशील व प्रेमळ बंधु यांनीं त्यांस मिळाला तसा त्यांचे इच्छेप्रमाणें पोंचता केला. परंतु ही मदत फार थोडे दिवसच मिळाली. राजवाडे यांनीं विशेष हाल काढले ते विठ्ठल छापखाना जळून भाषांतर मासिकाचें वाटोळें झाल्यावर आणि पहिला खंड प्रसिद्ध केल्यावरच सुमारें १२ वर्षें काढलें. पुढें पुढें हे हाल बंद झाले नाहींत तरी कमी झाले. असो. त्यांच्या जीवनाविषयीं असें पुष्कळ लिहितां

येईल आणि लिहावयासही पाहिजे. त्यांची **खरी योग्यता** कशांत होती त्याचीही चर्चा व्हावयास पाहिजे. ते नुसते इतिहास संशोधक नव्हते तर ते **इतिहास तत्त्वविवेचकहि** जबरे असून दिव्यदृष्टि आणि प्रज्ञावंत असे **विचारस्रष्टेहि** होते. ही त्यांची उच्च कोटी पटण्यासाठीं त्यांचे चरित्राचें व लिखाणाचें सप्रमाण, सांगोपांग असें पुष्कळ विवेचन व्हावयास पाहिजे. पण तो प्रसंग अर्थातच हा प्रस्तावनेचा नव्हे. राजवाडे इतिहासक संशोधन मंडळानें हें कार्य हातीं घेण्यास हवें आहे. असो. एवढें सांगून जो स्वराष्ट्राची भव्य स्मृती उजळण्यासाठीं स्वतः सर्वस्वें झिजला त्या महापुरुषाचा एक नम्र पाइक म्हणून कर्तव्य बुद्धीनें लिहिलेले हे चार शब्द त्यांच्या चरित्राचें व कार्याचें सखोल बुद्धीनें मनन करण्याची प्रेरणा उत्पन्न करोत अशी प्रभूस प्रार्थना आहे.

पुणें
जेष्ठ व. ३ शके १८९० } दत्तो वामन पोतदार.

# चरित्र लेखकाचे दोन शब्द.



हें चरित्र अत्यंत त्रोटक आहे व त्याचेंहि श्रेय खरोखर मला नाहीं. राजवाडे यांच्या मृत्युप्रसंगानंतर केसरींत आलेले लेख, मृत्यूनंतर झालेलीं भाषणें, विद्यासेवकांतील लेख व मुख्य म्हणजे राजवाडे तिलांजली अंक यांतील माहितीचा मी उपयोग करून हें अल्प चरित्र लिहिलें आहे. तिलांजलि अंकांतील कृष्णाजी पांडुरंग कुळकर्णी एम्. ए. सातारा, यांच्या लेखांतील मी अवतरणेंहि दिलीं आहेत. राजवाडे यांच्या प्रस्तावना व लेख बरेचसे स्वतः वाचून त्यांतील माहितीचा मी उपयोग केलेला आहे. चरित्रांतील बराचसा भाग राजवाडे यांच्या शब्दांतच मी दिला आहे. या अति संक्षिप्त चरित्रांत गुणलवबिंदु असलाच तर तोही माझा नसून ज्यांची माहिती मी उपयोगिली त्यांचा आहे. हा चरित्रात्मक निबंध माझ्यासारख्या मतिमंदाचा असूनही तो प्रकाशित करण्याचें काम अभिनव ग्रंथ मालेचे उत्साही व ध्येयप्रवण संपादक हुद्दार यांनीं स्वीकारिलें व माझ्याकडे निरंतर कृपा दृष्टीनें पाहणार गुरुवर्य पोतदार यांनीं मी प्रार्थितांच हजार कामें असतांही, या पुस्तकास प्रस्तावना लिहून गौरविलें याबद्दल उभयतांचा मी ऋणी आहें.

राजवाडे यांच्या छायाचित्रावर जन्म शक १७८६ घातला गेला, तो केसरींत पाहून घातला गेला. परंतु राजवाडे तिलांजलि अंकांत १७८५ हा शक त्यांच्या कुंडलींत आहे — तोच खरा समजला पाहिजे.

१०।६।२८ **पांडुरंग सदाशिव साने.**

# संपादकीय.

मालेचें सहावें पुष्प ' आदर्श शिक्षण ' या पुस्तकांतील निवेदनांत प्रारंभिक निधि १००० रु. मिळाल्यास स्वतंत्र पुस्तकें प्रसिद्ध करण्याचेंही कार्य माला अंगीकारिल असा उल्लेख मी केला होता. पण प्रारंभिक निधि जरी मिळाला नसला तरी माला आज सर्वस्वीं स्वतंत्र पुस्तक प्रसिद्ध करण्याचें धाडस करीत आहे. प्रस्तुतचें पुष्प अमळनेरच्या खानदेश शिक्षण मंडळाच्या हायस्कुलांतील विद्वान शिक्षक व गोखले चरित्र व ईश्वरचंद्रविद्यासागर या पुस्तकांचे कर्ते श्री. पांडुरंग सदाशिव साने यांनीं लिहिलें आहे. गेल्या जानेवारी महिन्यांत अमळनेरला गेल्यावेळीं श्री. साने यांच्याशीं प्रथमच परिचय झाला व पहिल्या भेटींतच केलेल्या विनंतीचा स्वीकार करून त्यांनीं मालेसाठीं राजवाडे चरित्राचें लिखाण पूर्ण केलें याबद्दल मी त्यांचा कायमचा ऋणी आहे. पुण्याचें इतिहाससंशोधन मंडळ हें कै. राजवाड्यांचें एक जिवंत स्मारकच आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. या मंडळाचें काम सुरुवातिपासून गु. दत्तोपंत पोतदार हे एकनिष्ठपणें व निरलसपणें करीत आले आहेत. अर्थातच गु. पोतदार यांस कित्येक वर्षे कै. राजवाड्यांच्या सहवासांत राहण्याचें भाग्य मिळालें आहे. अशा अधिकारी व्यक्तीची या पुस्तकास प्रस्तावना मिळाल्यास विशेष उचित होईल असें वाटल्यावरून मी व श्री. साने यांनीं त्यांस प्रस्तावना लिहिण्याबद्दल विनंती केली. विनंतीप्रमाणें आपला अमूल्य वेळ खर्च करून त्यांनीं सुंदर प्रस्तावना लिहून दिली यांत त्यांची राजवाडे—भक्तिच विशेषत्वानें प्रगट

होते. आमची विनंती स्वीकारून त्यांनीं मालेवरहि जो अनुग्रह केला त्याबद्दल माला त्यांची सदैव ऋणी आहे. या पुस्तकाचें मुद्रणाचें काम माझे मित्र श्री. न. ह. देशपांडे संपादक 'बालवसंत' यांनीं आपल्या बालवसंत छापखान्यांत केलें असून मुद्रितें तपासण्याचें काम श्री. पुराणीक व श्री मोहरीर शिक्षक, खानदेशशिक्षणमंडळ अंमळनेर यांनीं अत्यंत काळजीपूर्वक केलें आहे. याबद्दल या तिघांचाहि मी फार आभारी आहे.

माझें निवेदन संपविण्यापूर्वीं माले संबंधीं दोन शब्द लिहिलिण्याची वाचकांची परवानगी घेतो. येत्या जूनमध्यें मालेस सुरुवात होऊन अडीच वर्षें होतील. संकल्पाप्रमाणें तोंवर १० पुष्पें प्रसिद्ध व्हावयास पाहिजेत व तसा प्रयत्न मालेकडून कसोशीनें करण्यांत येईलहि. पण या बाबतींत मुख्य अडचण आर्थिक आहे. अमेरिका पथदर्शक व राजर्षि भीष्म या पुस्तकांचें पुनर्मुद्रणाचें काम याच वर्षांत करावें लागल्यानेंहि नवीन पुष्पाच्या मुद्रणाचें काम थोडें मागें पडलें मालेजवळ थोडाफार निधि असल्यास मालेचीं कामें वक्तशीरपणें होऊं शकतील. यासाठीं ५० रु. चा एक असे ५००० रु. चे १०० डिबेंचर्स ( कर्जरोखे ) पांच वर्षे मुदतीचे विक्रीस काढण्याचें मालेनें ठरविलें आहे. मालेच्या सघन ग्राहकांनीं मालेचे डिबेंचर्स घेऊन मालेच्या साहित्य प्रकाशनाच्या कार्यास आपलेपणानें मदत करावी अशी त्यांस नम्र विनंति आहे. डिबेंचर घेऊं इच्छिणाऱ्यांनीं आपला मनोदय कळविल्यास त्यांचेकडे यासंबंधीची 'सविस्तर योजना' पाठविण्यांत येईल.

आणखी एका नवीन बाबीसंबंधीं येथें खुलासा करणें प्राप्त

आहे. वर्गणीदारांची अडचण दूर करणें हीच ती बाब होय. ६ व्या पुष्पांतील निवेदनांत वार्षिक वर्गणीसंबंधीं उल्लेख केला होता. वार्षिक वर्गणी ठरविणें हें मालेच्या व ग्राहकांच्या दृष्टीनें सोयीचें व हिताचें आहे असें दिसून आल्यावरून येत्या जूनपासून वार्षिक वर्गणी **दोन रुपये** निश्चित केली आहे. ज्या वर्गणीदारास वा. व. ची योजना पसंत नसेल त्यांना पूर्ववतच पुस्तकें मिळूं शकतील. वा. व. ठरविण्यांत आल्यामुळें आतां ५ रु. च्या साहाय्यकांचा वर्ग ठेवण्याची अवश्यकता नाहीं. वा. व. त ५०० पृष्ठांचें वाङ्मय ग्राहकांस देण्याचें योजिलें आहे. वर्गणी मनी आर्डरीनें पाठविणाऱ्यांनीं **सव्वा दोन** रुपये पाठवावे. व्ही. पी. २ रु. ६ आ. ची जूनमध्यें करण्यांत येईल. एजन्सीच्या ठिकाणीं वर्गणी दोन रुपयेच फक्त पडेल.

ग्रंथ मालेस उत्तरोत्तर वाढती साहित्य सेवा करण्याचें सामर्थ्य प्राप्त होवो अशी इच्छा व्यक्त करून हें निवेदन संपवितो.

नागपूर शहर
७-६-१९२८

**श्रीधर नारायण हुद्दार.**

# कै. राजवाडे यांच्या चरणीं प्रणति.



### वृत्त–भुजंगप्रयात.

नमो विश्वनाथा नमो बुद्धिमंता । नमो तेजवंता नमो मानवंता ।
स्वभू तोषवीली, स्वभू भूषवीली । तिची कीर्ति, धीरा, दिगंतांत नेली ॥
धनाला, सुखाला विलासादिकांला । स्तुतीला जनांच्या, नृपांच्या कृपेला ।
तुवां हाणिली लाथ निःस्वार्थ होसी । परी कार्य केलें प्रचंड प्रकाशीं ॥
स्मृती पूर्वजांची किती स्तव्य दिव्या । किती शौर्य धैर्य प्रभा बुद्धि भव्या ।
परी तत्स्मृती टाकिली मालवोनी । जनांनीं जितात्मे गतश्री बनोनी ॥
स्मृती जागवीली, तुवां कष्ट केलें । निराशादिकांतें लयालागिं नेलें ।
तुवां ओतिला दुर्बलांतीं हुरूप । असें कार्य केलें, महंता, अमूप ॥
मलीना मनाला तुवां निर्मळोनी । मृतात्म्यांस तेजें तुवां चेतवोनी ।
वरी राख जी संचली, फुंकरोनी । तुवां प्रज्वळीला पुन्हां ज्ञान वन्ही ॥
तुझा धीर गाढा, निराशा शिवेना । तुझा निश्चयो थोर केव्हां ढळेना ।
अहो निःस्पृहा, निस्तुला, निष्प्रपंचा । किती साधिलें कार्य नेसून पंचा ॥
तुझें तेज वैराग्य विज्ञान सिंधू । तयाच्या पुढें शोभती अन्य बिंदु ।
तुझा आयसी वज्रवत् दिव्य देह । प्रतापी सदा मूर्त उत्साह गेह ॥
तुझ्या बुद्धिला कांहीं नाहीं अगम्य । सदा डुंबसी ज्ञानगंगेंत रम्य ।
किती पंकजें आणिलीं त्वां खुडोनी । मती आमुची गुंग होते बघोनी ॥

कुणी पाणिनी मानिती मूर्तिमत । गणावें गिबन् बोलती ज्ञानवंत ।
कळावी कशी योग्यता वास्तवीक । अम्हां, जे सदा मागतों रोज भीक ॥
स्वतंत्रा, तुवां दाविला नीट पंथ । तुला पाहुनी होत संस्फूर्त संथ ।
जिथें जात भास्वान्, नुरे अंधकार । तुझ्या दर्शनें भाषणें तो प्रकार ॥
पहाडापरी धीरधिंग प्रचंड । प्रतापप्रभा उज्वलन्ती उदंड ।
हरावा रिपू थोर अज्ञान, बंड । पुकारोनियां, थोपटीले स्वदंड ॥
करोनी रिपू चीत, तो ज्ञान राजा । तुवां सद्धटें आणिला देशकाजा ।
किती मांडला उत्सवो त्या प्रभूचा । अहा वाढला थोर लौकीक भूचा ॥
अलंकार राष्ट्रास होसी अमोल । सुधेचा तुझा सिंधु होईल बोल ।
तुझें स्तव्य चारित्र्य आदर्श लोकां । जया पाहुनी संहरावें स्वशोका ॥
किती सद्गुणवृंद वर्णूं वरेण्या । मला, बुद्धि राजा, न हें शक्य, धन्या ।
तुझ्या पूज्य संस्तव्य पादांबुजाला । करोनी नती नम्र हा पूत झाला ॥
तुझा देह तो पांच भौतीक गेला । त्वदात्मा महाराष्ट्र लोकांत ठेला ।
तुझी संस्मृती नित्य राही जिवंत । सदा राहसी अंतरीं मूर्तिमंत ॥

—पां. स. साने.

—— × ——

# कै. इतिहासाचार्य राजवाडे.

## विषय प्रवेश.



कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांचें नांव सुशिक्षित महाराष्ट्रीयाच्या निकट परिचयाचें आहे. राजवाड्यांसारख्या गाढया पंडित प्रवराचें चरित्र मीं लिहावयास घेणें म्हणजे टिटवीनें सागराचें गांभीर्य जाणूं पाहण्याप्रमाणें आहे. मी अप्रबुद्ध आहें; स्वतंत्र प्रज्ञेचा अल्पांशही मजमध्यें नाहीं; ज्या अनेक शास्त्रांत या विराट पुरुषाची विशालबुद्धी स्वैर संचारती झाली, त्या शास्त्रांचीं मला नांवें सुद्धां ऐकूनच माहीत. माझी ही यथार्थ स्थिति आहे; यांत फाजील विनय वगैरे कांहीं नाहीं. माझें मन मला पुन्हा पुन्हा सांगे कीं, राजवाड्यांसंबंधीं तूं काय लिहिणार? प्रश्न खरा; परंतु भक्तीला स्वस्थ बसवेना. राजवाड्यांच्याबद्दल माझ्या हृदयांत जी असीम भक्ति वसत आहे, तिला हें वरील तर्कट समजेना. राजवाडे यांच्यासंबंधीं जे जे उद्गार प्रत्यक्ष अप्रत्यक्ष वाचले वा ऐकले, त्या सर्वांचा उपयोग करून तूं लहानसें चरित्र त्यांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं प्रसिद्ध कर, असें माझी भक्ति बोलूं लागली व म्हणून मीं या कार्यास हात घातला. मला हें चरित्र त्या दिवशीं प्रसिद्ध करतां आलें नाहीं; परंतु आज तें लोकांसमोर येत आहे. ‘ स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं

जन्मती ' असेंच राजवाडे यांच्या बाबतींत मला म्हटलें पाहिजे. त्यांच्या निकट सान्निध्यांत ज्यांनीं वर्षें घालविलीं असतील, त्यांच्या प्रतिभेची प्रभा ज्यास सतत पहावयास मिळाली असेल व त्यामुळें ज्यांच्या हृदयांतील भ्रांतितिमिराचा निरास झाला असेल, राजवाड्यांच्या सर्वगामी बुद्धीचें वैभव ज्यांस आकलन करितां येईल, त्यांचा गूढ स्वभाव ज्यांस उकलतां आला असेल अशा पुरुषांनीं त्यांचीं चरित्रें लिहिलीं तर तीं पूज्य व आदरणीय होतील. तीं तशीं लिहिलीं जातीलही; परंतु भक्तीला कमी जास्त समजत नसतें. म्हणून माझी भक्ति मला सांगे ' जा, तूंही आपली वाक्सुमनांजलि त्या थोर पुरुषाच्या पदारविंदीं अर्पण कर. ' भक्तीचा एकच घांस विश्वमोलाचा असतो; तो परमेश्वरास प्रिय होतो; तद्वत् माझ्या या भक्तीनें कै. राजवाडे यांस संतोष होवो; त्यांस संतोष होईल कीं नाहीं हें मला कळावयास मार्ग नाहीं; परंतु आपलें कर्तव्य केल्यानें मला मात्र संतोष होत आहे खरा.

---

# प्रकरण १ लें.

## जन्म, बाळपण व शिक्षण.



कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांचा जन्म शके १७८५

आषाढ शु॥ अष्टमीस झाला. त्यांच्या आईचें नांव यमुना. बालपणीं त्यांची वृत्ति कशी होती, ते काय खेळत, कसे वागत वगैरे माहिती आम्हांस नाहीं. त्यांचें प्राथमिक शिक्षण वडगांव येथें झालें. राजवाडे यांच्या पितामहानें स्वराज्याच्या पडत्या काळांत लोहगडची किल्लेदारी केली होती. तेव्हां याच बाजूस त्यांचें प्राथमिक शिक्षण झालें. त्यांचे वडील बालपणींच निवर्तले. यामुळें त्यांचें लहानपणीं संगोपन शिक्षण वगैरे त्यांचया चुलत्यांनीं केलें. राजवाडे यांनीं स्वतः ' कनिष्ठ, मध्यम व उच्च शाळांतील स्व नु भव ' म्हणून ग्रंथ मालेमध्यें एक लेख पुष्कळ वर्षांपूर्वीं लिहिला आहे. त्यावरून त्यांच्या सर्व शिक्षणाची माहिती मिळते. आठ वर्षें वयाचे असतां त्यांनीं धुळाक्षरें शिकण्यास आरंभ केला. त्यांनीं हें मराठी शिक्षण ३ वर्षें घेतलें. येवढ्या काळांत त्यांनीं कधीं शाळेंत जाऊन तर कधीं घरीं राहून सामान्य मराठी पुस्तक वाचण्याइतकें भाषाज्ञान व केरोपंती अंकगणितांतील वाटेल ता प्रश्न सोडविण्याची तयारी हें संपादन केलें, या तीन वर्षांत भूगोल, इतिहास, व्याकरण, व्युत्पत्ति, भूमिति, काव्य यांची बिलकूल कल्पना त्यांस नव्हती; या गोष्टींचा त्यांच्या बालमनावर ठसा कांहींच उमटलेला नव्हता. या तीन वर्षांत ते शाळेंत सरासरीनें दीडवर्षं गेले असतील; बाकीचे सर्व दिवस धांगडधिंगा, मस्ती कुस्ती करण्यांत त्यांनीं दवडिले मारामाऱ्या करण्यांत त्यांचा पहिला नंबर असे; विटी-दांडूचा खेळ खेळण्यांत तर ते तरबेज. पोहण्यांतही चांगलेच प्रवीण झाले. एकही शिक्षक यां बालवयांत नीट शिक्षण देणारा त्यांस मिळाला नाहीं. ते या आत्मचरित्रांत सांगतात " पंतोजी आडमुठे, पोटभरू, इकडची पाटी तिकडे नेऊन टाकणाऱ्यापैकीं होते."

यामुळें आठवड्यांत फक्त दोन तीन दिवस घटका अर्धघटका अभ्यास करूनही पंतोजीची कृपा राजवाडे यांस संपादितां येई. ते म्हणतात " जर चांगला शिक्षक मला मिळता तर ३ वर्षांत मी बी. ए. इतकी तयारी केली असती. " या गोष्टींत कोणास अतिशयोक्ति वाटेल, परंतु मला तसें कांहींएक वाटत नाहीं. मिलसारखे पंडित किती बालवयांत लॅटीन ग्रीक भाषांचे पंडित झाले, ज्ञानेश्वरांसारखे किती बालवयांत भाष्यकारांस मागोवा पुसणारे झाले, ईश्वरचंद्र विद्यासागरांसारखे विशालधी १५।१६ वर्षें वयाचे असतांना कसे सर्व-शास्त्रपारंगत झाले, हें पाहिलें म्हणजे राजवाडे यांच्या म्हणण्यांत मला अत्युक्तिचा अंश दिसत नाहींसा होतो.

मराठी ४ थी इयत्ता शिकल्यावर राजवाडे पुण्यास आले व इंग्रजी शिकूं लागले. १८७६ मध्यें ते पुण्यास बाबा गोखले यांच्या इंग्रजी शाळेंत दाखल झाले. या शाळेंत ३।४ शें मुलें होतीं. शाळा सकाळीं सहा वाजल्यापासून दुपारीं १० वाजे पर्यंत असे. कारण शिक्षकांस दुपारीं इतर व्यवसाय करण्यास मोकळीक असावी म्हणून ही योजना असे. शाळा अगदीं गलिच्छ ठिकाणीं असे. दमट व कोंड-लेली अशी हवा असावयाची. मोकळी, खेळती हवा तेथें मिळावयाची नाहीं. पडक्या भिंती, गटारें, डांस यांमुळें प्रसन्नता मुळीं नसे; पायखानेही तेथें लागूनच; यामुळें दुर्गंधीचें माहेरघरच तेथें होतें. एकाच वर्गांत अनेक मुलें असत. त्या मुलांची तयारी सर्वांची सारखी-च नसे. कोणीं जास्त शिकलेला, कोणीं कमी; कोणीं हॉवर्डचे पहिलें पुस्तक पढलेला, तर कोणीं दुसरें वाचावयास शिकलेला. तरी सर्व एकाच वर्गांत. एकच मास्तर या निरनिराळ्या मुलांस नवीन धडे

देई. राजवाडे म्हणतात "माझ्या बरोबरीच्या मुलांच्या तुकडीच्या वांट्यास ५।४ मिनिटें तासांतील यावयाचीं व त्या ५।४ मिनिटांतील अर्धें मिनिट माझ्या वांट्यास यावयाचें!"

अशा प्रकारचें शिक्षण या शाळेंत कांहीं दिवस चाललें. पुढें बाबा. गोखले यांचें लक्ष वकिलीच्या धंद्याकडे गेलें व ही शाळा संपली. राजवाडे मग सरकारी शाळा, मिशनस्कूल यांमध्येंही कांहीं दिवस होते. प्रथम ते काशिनाथपंत नातू यांनीं काढलेल्या शाळेंत गेले. हे नातू मोठे विनोदी गृहस्थ होते; प्रसिद्ध वकीलांत नांव घेतलें जाई. या शाळेंत राजवाडे २ ऱ्या वर्गांत बसले. यानंतर वासुदेव बळवंत मुडके (बंडवाले), वामनराव भावे, लक्ष्मणराव इंदापूरकर यांच्या शाळेंत राजवाडे जाऊं लागले. येथें ते ३ रे इयत्तेंत शिकूं लागले १८७७ मध्यें ते चौथी इयत्ता शिकूं लागले. या सुमारास १०००।१५०० शब्द, कांहींसें व्याकरण अर्धेंमुर्धें हें त्यांनीं पैदा केलें. १८७७,७८,७९ ही तीन वर्षें ते या भावे यांच्या शाळेंत राहिले. या शाळेंतील वामनराव भावे यांच्याबद्दल राजवाडे यांनीं आदरानें लिहिलें आहे. पुढें ही शाळा पण त्यांनीं सोडली व १८८० मध्यें बोमंट यांच्या मिशन शाळेमध्यें ते दाखल झाले. ती पण शाळा कांहीं दिवसांनीं त्यांनीं वर्ज केली व घरींच बसले. न्यू इंग्लिश स्कूल स्थापन झाल्यावर त्या शाळेंत ते कांहीं दिवस-फक्त १५ दिवसच होते. शेवटीं घरींच अभ्यास करून १८८२ च्या जानेवारी महिन्यांत खाजगी रीतीनें मॅट्रिकच्या परिक्षेस ते बसले व त्यांत उत्तीर्ण झाले. पांच सहा शाळा पाहिल्यामुळें त्यावेळच्या एकंदर शिक्षणप्रकाराचा, शिक्षकवर्गाचा त्यांना नीट

अनुभव आला. अपेयपान, अभक्ष्यभक्षण, चारगटपणा. बाहेर-ख्यालीपणा वगैरे दुर्गुणांनीं भरलेले शिक्षक या खासगी शाळेंत असत.

अर्थात् व्यसनांचे बंदे गुलाम, सुरादेवांचे कट्टे उपासक असे शिक्षक विद्यार्थ्यांच्या मनावर काय परिणाम करणार नीति ही उपदेशानें अंगीं मुरत नसते. तर उपदेशकर्त्यांच्या कृतीनें मनावर ठसते हा सिद्धांत आहे. विद्यार्थी उत्तम तयार होण्यास शिक्षकवर्ग स्वाभिमानी व देशप्रेमी, विद्वान् व कार्य-कर, विचारवंत, आचारवंत, धर्मशील व उद्योगशील, असे असले पाहिजेत, परंतु त्यावेळेस तसे शिक्षक कोठेंच नव्हते. नाहीं म्हणावयास नवीन चिपळूणकरी शाळेंत हे थोडेंफार प्रथम दिसून येई. राजवाडे लिहितात " या सुमारास विद्वत्तेनें व मनोरचनेनें राष्ट्रहित साधण्यास बराच लायक असा एक पुरुष सरकारी नोकरीस लाथ मारून पुण्यास आला. " हा थोर पुरुष म्हणजे विष्णूशास्त्री हा होय. विष्णूशास्त्री यांचे बद्दल राजवाडे यांस फार आदर व पूज्यभाव वाटे. शास्त्रीबोवांची प्रौढ व भारदस्त मूर्ति पुण्यांत त्यांनीं अनेकवेळां पाहिली होती. शास्त्रीबोवा हे परमदेशभक्त आहेत असें अनेकांच्या तोंडून त्यांनीं ऐकिलें होतें. त्यांचे निबंधही त्यांनीं अवलोकिले होते व वाचलेले त्यांच्या कानांवरून गेले होते.

मॅट्रीक झाल्यावर मुंबईस एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें राजवाडे दाखल झाले. पहिली सहामाही त्यांना या कॉलेजमध्यें घालविली त्या वेळेस कॉलेजमध्यें शिकविणारे प्रोफेसरांची त्यांनीं आपल्या

लेखांत खूप टर उडविली आहे. ऑलिव्हर म्हणून एक गृहस्थ इंग्रजी शिकवी. ' Not ' हा शब्द नकारार्थी आहे हें अपूर्व ज्ञानसुद्धां हे गृहस्थ कधीं कधीं समजून देत असत. राजवाडे त्यावेळस नेमलेल्या इंग्रजी पुस्तकांबद्दल लिहितात ' प्रवेशपरिक्षेच्या वेळेस मी जे ग्रंथ वाचले होते त्या मानानें हें पुस्तक केवळ पोरखेळ वाटला; आठ दहा वर्षांच्या इंग्रजी मुलांस वाचावयास हें ठीक आहे. घोडमुलांस अशा पुस्तकांचा उपयोग होतो. असें नाहीं.' हें पुस्तक म्हणजे सौदेकृत ' नेलसनचें चरित्र, हें होय.

हा गंमतीचा अभ्यासक्रम मुंबईस चालू होता. या वेळेस म्हणजे १८८८ मध्यें विष्णुशास्त्री यांच्या शोकप्रधान मृत्यूची वार्ता सर्वत्र पसरली व राजवाडे यांस फार वाईट वाटलें. विष्णूशास्त्री यांस ते ' महात्मा ' म्हणून संबोधित. त्यावेळीं जें जें म्हणून स्वतःचें त्याची त्याची टर उडविण्याची जी परंपरा पडली होती, त्या परंपरेस, त्या प्रवातास ज्यानें आपल्या प्रभावशाली लेखणीनें परागंदा केले त्या त्या पुरुषास ते महात्मा म्हणून संबोधित. स्वदेशस्थिति समजाऊन सांगणारा, स्वभाषेचें वैभव वृद्धिंगत करणारा थोर पुरुष निघून गेल्यामुळें त्यांच्या तरुण व उदार मनास फार दुःख झालें. ते लिहितात ' त्यावेळीं महत्‌दुःख झालें. मरण हें मनुष्याची प्रकृती आहे. ही गोष्ट तोंपर्यंत माझ्या अनुभवास आली नव्हती. तारुण्याच्या मुशींत जगताच्या या तीरावर स्वैर व निभ्रांत हिंडत असतां जेथून कांहीं कोणी परत आला नाहीं, त्या तीराची मला कल्पनाच नव्हती: सर्व मनुष्यें व प्राणी अमर आहेत

अशी माझी अस्पष्ट भावना होती. या भावनेला शास्त्रीबोवांच्या मृत्यूनें जबर धक्का बसला. शाळेंतून जातांना व येतांना आणि शहराच्या पश्चिम भागांत हिंडतानां शास्त्रीबोवांच्या मूर्तीस अनेकवार पाहिलें होतें. त्या पुरुषासंबंधानें अनेक गोष्टींचा माझ्या मनावर संस्कार झाला असल्यामुळें त्यांच्या मरणानें मला दुःख झालें.'

पहिली सहामाही संपल्यावर दुसरी सहामाही राजवाडे कॉलेजमध्यें गेलेच नाहींत. पैशाची अडचण व इतरही कांहीं अडचणीं यांमुळें हें शक्य झालें नाहीं. ते पुण्यास आले व खासगी शिकवणीचा जुजुबी धंदा ते करूं लागले. राजवाडे यांनीं एक वर्ग काढला व त्यांत १५।२० मुलें येत. ३०।३५ रुपये या दोन तासांच्या वटवटीनें मिळून जात. दीड दोन वर्षें त्यांनीं हा धंदा चालविला. इतर कांहीं वाचन वगैरे चाललेंच होतें. १८८४ मध्यें राजवाडे यांचे वडील बंधू यांस दक्षिणा फेलो ही डेक्कन कॉलेजमध्यें जागा मिळाली. राजवाडे यांनीं दुसरी टर्म डेक्कन कॉलेजमध्यें भरली व एक महिनाभर अभ्यास करून दुसऱ्या वर्षांत ते पास झाले. १८८५ मध्यें त्यांनीं कॉलेजमध्यें दोन्हीं टर्म्स भरल्या, परंतु ते परीक्षेस बसले नाहींत. सहामाही, तिमाही, नऊमाही वगैरे परीक्षांस राजवाडे बसत नसत. तेंच तेंच पुन्हा पुन्हा घोकून काय करावयाचें ? वार्षिक परीक्षेंत पास झालें म्हणजे झालें असें ते म्हणत. भावाकडून पैशाची मदत होऊं लागल्यावर ते १८८६–८७ कॉलेजच्या वसतिगृहांतच जाऊन राहिले. येथें

राहिल्यावर त्यांनीं आपला स्वच्छंद कार्यक्रम सुरू केला. लो. टिळकांप्रमाणें त्यांनीं येथें प्रकृतीची फार उत्तम काळजी घेतली. भावी आयुष्यांत अत्यंत कष्टप्रद काम तीन तपें त्यांनीं जें केलें त्यासाठीं वज्रप्राय कणखर शरीर असणें जरूर होतें. त्यांचा ह्या वेळचा कार्यक्रम त्यांच्याच शब्दांत सांगितला तर फार योग्य होईल. "नियमानें पांच वाजतां पहांटेस मी उठत असें व तालमींत जाऊन दोन तास उत्तम मेहनत करीत असें. बैठका, जोर, जोडी, मलखांब व कुस्ती अशी सुमार दीड दोन हजार मेहनत रोजची होई, तों सात वाजत. नंतर शेर दीडशेर दूध पिऊन अर्धा तास कॉलेजाभोंवतालील मैदानांत व झाडाखालीं सहल व विश्रांति घेई. आठापासून नऊपर्यंतचा वेळ वर्तमानपत्रें वाचण्यांत जाई. पुढें एक तास नदीवर पोहणें होत असे. परत येऊन भोजन आटोपून खोलीकडे जों यावें तों नेमके साडेअकरा वाजत. नंतर अर्धा तास समानशील अशा दोन चार सद्‌गृहस्थांच्या समागमांत धूम्रपान आटोपून कॉलेजांतील पुस्तकालयांतून आणिलेलें एखादें पुस्तक हिंडत, फिरून निजून व बसून मी चांगलें वाचून मनन करीत असें. वर्गांतील शिक्षकांच्या व्याख्यानांस मी प्रायः कधीं जात नसें. इतर परीक्षार्थी विद्यार्थी जे चार तास वर्गांत घालवीत ते मी स्वतंत्र पुस्तकें वाचण्यांत घालवीं. वाचण्याचें काम साडे-चार चारपर्यंत चालें व नंतर बंद होई. मग शादिलबोवा-जवळील होडीखान्यांत एखाद्या होडग्यांत सात वाजेतों नदीवर पांच सात मैलांचें वल्हवणें करीं. तेथून परत येऊन संध्या

भोजन जों आटोपावें तों साडे आठ वाजत. नंतर दहा साडे दहा वाजेतों अनेक स्वभावांच्या विद्यार्थ्यांशीं सामाजिक, राजकीय, धार्मिक व पाठशालीक विषयांवर पाच पन्नास विद्या खलास होईपर्यंत नानाप्रकारच्या गप्पा चालत. साडेदहापासून पहांटेच्या पाच वाजेपर्यंत खोलींतील दोन टेबलांवर घोंगडी पसरून त्यावर ताठ उताणें निजलें म्हणजे मला गाढ झोंप येई. मेहनतीनें अंग इतकें कठीण होऊन जाई कीं, मऊ बिछान्यावर मला कधीं झोंपच येत नसे. १८८४ पासून १८९० पर्यंतच्या सात वर्षांत मी एकही दिवस कधीं आजारी पडलों नाहीं."

अशाप्रकारचा स्पृहणीय दिनक्रम या महापुरुषाचा चालला होता. ते दुपारीं पुष्कळ वेळां सर्वांच्या मागून जेवावयास जात. एकतर त्यांचा आहार दांडगा असे व दुसरें शांतपणें जेवण होई. ते दूध शेळीचें पीत असत. क्रिकेट व टेनिस यांस त्यांनीं कधीं स्पर्शही केला नाहीं. आपलें शरीर मोकळ्या हवेंत जितकें अधिक ठेवतां येईल तेवढें ठेवण्याची ते खबरदारी घेत. सूर्यप्रकाश व मोकळी शुद्ध मुबलक हवा हीं शरीरास जितकीं मिळतील तितकीं थोडींच अशा व्यायाम पद्धतीनें राजवाडे यांनीं आपली प्रकृति निकोप व सुदृढ करून घेतली व मरेपर्यंत कधीं म्हणून कधींच आजारी पडले नाहींत. हीं शरीराची जोपासना चालू असतां त्यांनीं बुद्धि व मन यांची जोपासना पण एकनिष्ठपणें चालविली. १८८४–९० पर्यंत आलटून पालटून अनेक विषय त्यांनीं चाळले. कोणता विषय

घ्यावा हें ठरेना. गणितशास्त्र, वनस्पतिशास्त्र, मानसशास्त्र वगैरे निरनिराळ्या शास्त्रांत त्यांनीं हात घातला व सर्वांची चाचणी करून ते सोडले. शेवटीं इतिहास हा विषय त्यांनीं घ्यावयाचें ठरविलें व त्या दृष्टीनें ते वाचूं लागले. जरी इतिहास हा विषय घेण्याचें ठरलें तरी अवांतर वाचनाचा नाद जो लागला तो कमी झाला नव्हता. ते कॉलेजमध्यें इतिहास हा विषय घेतलेले एकमेव विद्यार्थी होते. त्यांना कॉलेजमध्यें प्रोफेसरांच्या तासांस गेलें नाहीं तरी चालेल अशी परवानगी देण्यांत आली होती. बी. ए.च्या परीक्षेंत पास होण्यासाठीं ' हिंदुस्थानाचा व महाराष्ट्राचा इतिहास मॅट्रिकच्यावेळीं जेवढा मी शिकलों होतों तेवढा ' बस होता असें राजवाडे यांनीं लिहिलें आहे. यामुळें त्यांस इतर वाचन भरपूर करावयास फिकीर वाटली नाहीं. " इतिहास, अर्थशास्त्र. नीतिशास्त्र, राजनीतिशास्त्र, तर्कज्ञान, तर्कशास्त्र व मानसशास्त्र यावरील प्राचीन व अर्वाचीन, अस्सल व भाषान्तरित बरेच ग्रंथ मी मननपूर्वक वाचले. शिवाय वनस्पतिशास्त्र व फारशी भाषा कामापुरती मी शिकलों. कोशाच्या व व्याकरणाच्या साहाय्यानें एखादा फ्रेंचग्रंथहि मी वाचीत असें. प्लेटोचें सुराज्य ( रिपब्लिक ) ह्याचवेळीं मी सबंध मराठींत उतरलें " असें आपलें अध्ययनवृत्त त्यांनीं लिहून ठेविलें आहे. त्यांच्या दांडग्या व्यासंगास, प्रखर प्रज्ञेस शांतविणारें महाविद्यालय हिंदुस्थानांत नव्हतें. ते मोठ्या खेदानें लिहितात " खरें म्हटलें असतां, ज्ञानार्जनामध्यें ज्यांचें सर्व आयुष्य गेलें, विद्येची मर्यादा वाढविण्यांत ज्यांनीं तपेंच्या

तपें घालविलीं व सर्व शास्त्रांत अपूर्व शोध करून मानवजातीला ज्यांनीं अक्षय ऋणी करून ठेविलें, अशा गुरुवर्यांनीं चालविलेली एखादी पाठशाळा त्यावेळीं असावयास पाहिजे होती. म्हणजे तेथें १०।२० वर्षें राहून वरील सिद्धांताच्या अनुरोधानें म्हणजे विद्या केवळ ज्ञानार्जनाकरितां शिकावयाची या सिद्धांताच्या अनुरोधानें– विद्यार्जनाची माझी हौस, अधिकारी गुरूंच्या देखरेखीखालीं मी पुरवून घेतली असती. परंतु दुर्दैव कीं अशी पाठशाळा व असे गुरू मला त्यावेळीं मिळाले नाहींत. " ४५ वर्षांपूर्वीं जी रडकथा राजवाडे यांनीं गायिली तीच आजही प्रत्यक्ष आहे. एम्. ए झाला कीं झाला आचार्य. प्रोफेसर ही पदवी इतकी सोपी आहे कां ? कॉलेजमध्यें शिकविणारे कांहीं प्रोफेसर जें पुस्तक शिकवावयाचें त्याचीं पानेंही वर्गांत फाडतात., इतकी शिकविण्याबद्दल त्यांची आस्था. मग त्या त्या ज्ञानप्रांतांतील ज्ञान आत्मसात् करून, त्याच्या मर्यादा वाढवूं पाहणारे व वाढविणारे किती असतील हें मनाशींच ठरवावें. सर्व एकंदरीनें खेळखंडोबा झालेला आहे. ज्ञानाची टर चालली आहे. तपेंच्या तपें तीव्रतेनें अध्ययन केल्याविना गाढें पांडित्य कसें संपादन करितां येणार ? परतु आमच्याकडे ज्ञान म्हणजे परसांतलीं भाजी झाली आहे.

असो. राजवाड्यांचा खाक्या तर त्यांच्या छंदाप्रमाणें चालू राहिला. रात्रीं ते निरनिराळ्या विषयांवर इतर मुलांबरोबर अनेक विषयांवर चर्चाही करीत. त्यांस विड्या ओढण्याचें व्यसन मात्र लागलें. ५।५० विड्या ते व इतर मंडळी सहज फंस्त करीत. दुसरी गोष्ट म्हणजे सर्व व्यवहार वगैरे इंग्रजीं-

तून चाले. राजवाडे लिहितात. "एका दुष्ट खोडीनें मात्र मला अतोनात ग्रासिलें. ती खोड म्हणजे दुसरी तिसरी कांहीं नाहीं. इंग्रजी बोलण्याची व इंग्रजींत विचार करण्याची. बाराव्या वर्षापासून २६ व्या वर्षापर्यंतच्या पंधरा वर्षांत, वाचणें, लिहिण, विचार करणें वगैरे सर्व मानसिक क्रिया मी इंग्रजींत करूं लागलों. शाळेंत व कॉलेजांत प्राचीन व अर्वाचीन मराठी ग्रंथांशीं शिक्षकांनीं व परीक्षकांनीं माझी क्षणभरही ओळख करूं दिली नाहीं. त्यामुळें स्वभाषेंत कांहीं प्रासादिक व नामांकित ग्रंथच नाहींत, असें इतर परीक्षार्थ्यांप्रमाणें माझेंहि मत व्हावयाला कोणतीच हरकत नव्हती. तशांत कुंटे, रानडे वगैरे विद्वान् लोकहि मोठमोठीं व्याख्यानें इंग्रजींत झोडीत. कॉलेजांत तर बहुतेक सर्व व्यवहार इंग्रजींतच करूं लागलों. बंधूंना व मित्रांना पत्रें लिहावयाचीं तीं इंग्रजींत; आचाऱ्याशीं व गड्यामाणसाशीं बोलावयाचें तेंहि मराठीमिश्रित इंग्रजींत; डिबेटिंग सोसायटींत मोठमोठीं अद्वातद्वा व्याख्यानें द्यावयाचीं तीं इंग्रजींत; देशी कपडे वापरणारी मंडळी कॉलेजांत काढिली. तिचें सर्व काम इंग्रजींत; व्यायामाचे सर्व प्रकार करावयाचे ते इंग्रजींत; सारांश सतत पंधरा वर्षें बारा आणि बारा चोवीस तास सर्व कामें मी इंग्रजींत करूं लागलों. या एवढ्या अवधींत मी मराठी बहुतेक विसरून जावयाचा; परंतु दोघा तिघा गृहस्थांनीं मला ह्या विपत्तींपासून वांचविलें. विष्णुशास्त्री चिपळोणकराच्या टीकात्मक निबंधांनीं इंग्रजीच्या या खग्रासापासून माझा बचाव केला. काव्येतिहास संग्रहकारांच्या ऐतिहासिक पत्रांनीं स्वदेश म्हणून कांहीं आहे हें मला कळलें. व परशुरामपंत तात्या गोडबोले ह्यांनीं छापलेल्या काव्यांनीं

महाराष्ट्रसारस्वताचा मला अभिमान वाटूं लागला. हे तीन ग्रंथ जर माझ्या दृष्टीस न पडते, तर आज मी कुंत्र्यांच्या सारखीं इंग्रजींत व्याख्यानें देण्यास, सुरेंद्रनाथांप्रमाणें बूटपाटलोण घालून देशाभिमानाचीं पत्रें काढण्यास, किंवा सुधारकांप्रमाणें बायकांना झगे नेसवण्याच्या ईर्ष्येस क्वचित लागलों असतों. सुदैवानें ह्या देशाभिमान्यांच्या प्रयत्नानें माझी अशी विपत्ति झाली नाहीं. नाहींतर असले कांहीं चमत्कार माझ्या हातून निःसंशयं घडते ! दारू पिणारे, मांस खाणारे, बूट पाटलोण घालणारे, स्वदेशाला, स्वभाषेला व स्वधर्माला तुच्छ मानणारे गांवठी साहेब त्यावेळीं कॉलेजांतल्या परीक्षार्थ्यांत अगदींच नव्हते असें नाहीं. परंतु त्यांचा संसर्ग उपरिनिर्दिष्ट ग्रंथकारांच्या ग्रंथांतील मतल्बानें मला घडला नाहीं. विद्यार्थी धर्मलंड होतो कीं दुराचारी होतो, इकडे कॉलेजांतील शिक्षकाचें मुळींच लक्ष नसे. कॉलेजांतील युरोपीय शिक्षकाच्या मतें माफक दारू पिणें, बूटपाटलोण घालणें, स्वधर्माप्रमाणें न चालणें, स्वभाषा विसरणें हीं कांहीं पापें गणिलीं जात नसत. तेव्हां ते ह्या गोष्टींत लक्ष घालीत नसत हें स्वाभाविकच होतें. गुरूंचा धाक नाहीं, पुढाऱ्यांचा कित्ता नाहीं, धर्माचा प्रतिबंध नाहीं, अशा स्थितींत मी पंधरा वर्षें काढिलीं. तींतून मी सुरक्षित पार पडलों त्याचें सर्व श्रेय वरील तीन ग्रंथकारांकडे आहे."

राजवाडे यांच्या वरील लिहिण्यांत कोणास अतिशयोक्ति, विपर्यास कदाचित् दिसेल; पोषाख वगैरे कांहीं कां असेना; पोषाखावर स्वदेशप्रेम व स्वधर्मप्रेम थोडेंच अवलंबून आहे असें कांहीं म्हणतील; परंतु बाहेरच्या गोष्टी ह्या आंतील भावाचें दिग्दर्शन

पुष्कळ वेळां करितात. बारीक सारिक गोष्टींत परकी येऊन हळुहळु नकळत आपण पूर्णपणें परकी व स्वपरंपरेस पारखे बनत चाललों आहोंत. " Ill habits gather by unseen degrees " असें म्हणतात. अशा गोष्टींत कडवेपणा पाहिजे. साळसूदपणा उपयोगी नाहीं. भगिनी निवेदिता यांची अशी गोष्ट सांगतात कीं, एकदां शाळेंत शिकवीत असतां Time यांस देशी शब्द त्यांस पाहिजे होता. ती शाळा बंगाली भाषा बोलणाऱ्या मुलींची होती. त्यांनीं मुलींस विचारिलें. परंतु मुलींस उत्तर देतां येईना. शेवटीं ' रेखा ' असें एकीनें सांगितलें. त्याबरोबर निवेदिता बाई ' रेखा, रेखा ' घोकीत आनंदानें निघून गेल्या. हिंदुस्थान हा देश त्यांनीं आपला मानला होता व म्हणून त्यांस भारतीय भाषेची ही आस्था व गोडी. आमचा तर जन्मप्राप्त, हा देश आहे; मानीव नाहीं असें असून स्वभाषेची हेळसांड मोठमोठ्या लोकांनीं कां करावी ! मोठमोठ्या पुस्तकांवर अभिप्रायही इंग्रजींत; ते ग्रंथलेखकांस कळले नाहीं तरी चालतील ! अशी उपेक्षा कां ? आपण पूर्ण स्वदेशी राहावें व परकीयाचें सर्व उत्तम आपल्या संस्कृतींत मिळवून घ्यावें. मराठी भाषेबद्दल त्या काळांत ज्यांनीं लोकोत्तर अभिमान दाखविला त्यांत शंकर बाळकृष्ण दीक्षित यांचें नांव प्रथम उच्चारिलें पाहिजे. अहर्निश १०।१२ वर्षें खपून त्यांनीं ज्योतिषशास्त्राचा प्रचंड इतिहास मराठींत लिहिला. न्या. रानडे वगैरे त्यांस हा ग्रंथ इंग्रजींत लिहून प्रसिद्ध करावयास सांगत होते. परंतु या थोर पुरुषानें उत्तर दिलें " ज्ञानार्जनाची हौस असेल तर माझी मराठी भाषा शिकतील. पाश्चात्य लोक माझ्या ग्रंथाची पूजा करितील; मी परकी भाषेंत

माझा ग्रंथ लिहिणार नाहीं. मी कीर्तीचा हपापलेला नाहीं. " चिपळूणकर, दीक्षित, राजवाडे यांसारखीं भाषाभिमानी माणसें ज्यावेळेस अनेक उत्पन्न होतील, भाषाभिमानाची कडवी रजपूती कृति जेव्हां आमच्यांत उद्भूत होईल, त्यावेळेसच आमची भाषा सजेल व सुंदर होईल. कीर्ति पैसा यांची अपेक्षा ठेवून मराठी संपन्न होणार नाहीं. मराठींत जें अमोल प्राचीन काव्य आहे, तें अर्थाभिलाषी कविवरांनीं विनिर्मिलें नाहीं. ज्ञानेश्वरांसारख्या वागीश्वरांनीं आपल्या अमृतासमान ओंव्या कोळशानें खांबावर लिहिल्या; दासोपंतानें निंबाचा पाला खाऊन लक्षावधि ग्रंथ लिहून ठेविला. या प्राचीन वाग्वीरांप्रमाणें निःस्वार्थ होऊन ज्यावेळीं आम्ही लिहावयास लागूं त्यावेळेस मराठी समृद्ध होण्यास वेळ लागणार नाहीं. परंतु हें करावयास जो तयार होईल त्याला खरी मायभाषेची माया पाहिजे; प्रेम पाहिजे; आस्था व अभिमान पाहिजे. आचार, विचार, भाषा यांत परकीयत्व स्वीकारल्यामुळें स्वजनांपासून आपण कसे दूर जात चाललों, व सुशिक्षित ही एक नवीनच जात कशी निर्माण झाली आहे हें दिसून येतें; असहकारितेपासून पुन्हां लेंबकास विरुद्ध दिशा मिळूं लागली आहे. सारांश राजवाडे यांनीं वरील अवतरणांत जें लिहिलें आहे तें अगदीं निर्विकार दृष्टीनें पाहिलें व दूरवर विचार करून पाहिलें तर पटेल असें वाटतें.

निबंधमाला, नवनीत, व काव्येतिहाससंग्रह या त्रयीनें आपणांस राजवाडे दिले. निबंधमालेनें एक राजवाडे दिला एवढ्यानेंच निबंधमाला कृतकार्य झाली. तत्कालीन व तत्पूर्वकालीन नवसुशिक्षितांस प्राचीन इतिहास, काव्य सर्व अज्ञातच होतें. ज्यावेळेस रा. ब.

मानें यांनीं बखरी सारखें सुंदर हृद्य व जोरदार वाङ्मय छापावयास घेतलें, त्यावेळेस मराठीचे पाणिनि दादोबा आश्चर्यचकित होऊन म्हणाले, " आं, असें सुंदर वाङ्मय मराठींत आहे!" स्वदेश व स्वभाषा यांबद्दल अभिमान ज्यांनीं या भावी महापुरुषाच्या हृदयांत उद्दीप्त केला ते खरोखर कृतार्थ होत.

ज्या कॉलेजमध्यें राजवाडे शिकत होते, त्याची आजूबाजूची स्थिति चित्तवृत्ति विषण्ण करणारी होती. ज्या लढाईनें पुण्याचें पेशव्याचें राज्य गेलें, ती लढायी येथेंच झाली. तेथें हिंडत असतां पुढील आयुष्यांत पूर्वजांची स्मृति जागृत करणाऱ्या या थोर पुरुषास फार उद्विग्नता प्राप्त होई. याच पुणें शहरांत इंग्रजांचे वकील हातरुमाल बांधून पेशव्या समोर सविनय जाऊन उभे रहात; याच पुण्यांतील प्रतापी वीरांनीं अटकेपर्यंत अंमल बसविला; याच पुण्यांतून हिंदुस्थानचीं सूत्रें खेळविलीं जात. परंतु काळाचा महिमा अतर्क्य! सातहजार मैलांवरचे गोरे लोक येथें येऊन आम्हांस गुलाम करून राहिले आहेत; त्यांनीं स्थापन केलेल्या शाळाकॉलेजांतून त्यांनीं लिहिलेलीं पुस्तकें पढत आहोंत! आमचे लोक त्या रणरंगधीर पूर्वजांची पूज्य दिव्य स्मृतिही विसरून गेले व त्यांस लुटारू, दरवडेखोर, खुनी, लबाड असलीं शेलकीं विशेषणें पाश्चात्यांनीं दिलेलीं खरीं मानूं लागले! हरहर! काय आमची दुर्दशा! समरचमत्कार जरीं सद्यःकालांत शक्य नसलें, घोड्यावर अढळ मांड ठोकून समशेर लटकावून व भाले सरसावून पुन्हा दिशांत झेंडा मिरवितां येणें सद्यःस्थितींत शक्य नसलें, तरी ज्यांनीं ती

महनीय कामगिरी केली, त्यांस आम्ही दूषणें दिलेलीं ऐकावीं न त्यांचीच स्वतः री ओढावी इतका आमचा अधःपात कशानें झाला ! अशाप्रकारचे शेंकडो कल्लोळ उडविणारे विचार राजवाडे यांच्या हृदयसमुद्रांत उसळत असत. याच क्षेत्रीं हिंडतां फिरतां त्यांस शहाजी, शिवाजी, रामदास, बाजी यांची स्मृति जळजळींत स्फुरली असेल. येथेंच बसतां उठतां आपलें वैभव त्यांच्या कल्पना दृष्टीस दिसलें असेल व तें दिव्य वैभव, तें यशोगान पुनरपि गावयाचें असें त्यांनीं ठरविलें असेल !

राजवाडे कॉलेजांत राहिले त्यामुळें शरीर कणखर बनलें; बुद्धि प्रगल्भ, कुशाग्र व अनेक विषयावगाहिनी बनली. १८८४ च्या शेवटीं कोणत्याच परीक्षेस न बसतां ते कॉलेज सोडून गेले. पुढें १८८८ मध्यें बाहेरचा विद्यार्थी म्हणून पहिल्या बी. ए. च्या परीक्षेस ते गेले व पास झाले. ह्या परीक्षेचा सर्व अभ्यास २०।२५ दिवसांतच त्यांनीं केला. पुढें १८८९ मध्यें भावे यांच्या शाळेंत ते वनस्पतिशास्त्र शिकवीत होते. एक वर्षभर हें काम करून पुनरपि १८९० मध्यें ते डेक्कन कॉलेजमध्यें रहावयास गेले. इतिहास हा विषय ऐच्छिक घेऊन ते परीक्षेस बसणार होते. हा विषय शिकविणारा कोणी शिक्षकच तेथें नसल्यामुळें वर्गांत जाण्याची अजिबात जरूर राहिली नव्हती. राजवाडे लिहितात "निव्वळ कॉलेजातील खोलीचा, हवेचा व जवळील नदीचा उपयोग करून घेण्याकरितां मीं ८० रुपये फी भरली. कॉलेजांत राहून तनु दुरुस्ती करावी, हा माझा तेथें राहण्यांत उद्देश होता." १८८९ च्या डिसेंबर महिन्यापासून ते १८९० च्या आक्टोबरपर्यंत तेथेंच

येथेच राहिले. नंतर एक महिनाभर परीक्षेचा अभ्यास नीट कसोशीनें करण्याकरितां ते पुण्यापासून बारा कोसांवर वडगांव म्हणून एक खेडें आहे तेथें जाऊन राहिले. १८९० च्या जानेवारी महिन्यांत ते बी. ए. ची परीक्षा पास झाले. राजवाडे लिहितात " मॅट्रिकपासून बी. ए. पर्यंत मी कधीं नापास झालों नाहीं; १८८४ सालीं प्रथम मी डेक्कन कॉलेजांत गेलों, त्यावेळीं दर दोन दोन महि-न्यांनीं एक एक परीक्षा जर घेतली असती, तर ह्या तिन्ही परीक्षा पहिल्या सहामाहींतच मी पास झालों असतों. परंतु सहा टर्मा, सहामाही व उपान्त्य परीक्षा व मुंबईच्या फेऱ्या, अशा नानाप्रका-रच्या खुळांत सांपडल्यामुळें १८८४ पासून १८९० पर्यंत मला व्यर्थ रखडत रहावें लागलें. ह्या रखडण्यांत इतकें मात्र झालें कीं, माझ्या मनाला जें योग्य वाटलें तेंच मी केलें; आणि कॉलेजांतील खुळसर शिस्तीला बळी न पडतां मन व मेंदू यांना शैथिल्य व क्षीण येऊं न देतां, जगांत जास्त उत्साहानें काम करण्यास मी सिद्ध झालों."

१८९० मध्यें परीक्षा बी. ए. ची झाली. मनानें व शरीरानें कर्तबगारी करावयास तयार झालेला हा वीर आतां हळूहळू आप-ल्या उद्दिष्ट ध्येयाकडे कसा गेला हें आतां पाहूं.



# प्रकरण २ रें

# इतिहास संशोधन व इतिहास मंडळ.



राजवाडे १८९० मध्यें बी. ए. ची परीक्षा पास झाले. ते प्रथम कांहीं दिवस भावे स्कूलमध्यें शिक्षक झाले. नंतर न्यू इंग्लिश स्कूलमध्यें ते शिक्षक म्हणून कांहीं दिवस होते. सहावी इयत्तेस Lamb's Tales हें पुस्तक राजवाडे १८९१ मध्यें शिकवीत असत. ब्राह्मण मासिक पत्रिकेच्या राजवाडे तिलांजली अंकांत श्री. काकाराव पंडित हे लिहितात ' कै. राजवाडे यांची शिकविण्याची पद्धत कांहीं विशेष होती. कोणत्याही विद्यार्थ्यानें धड्यांतील आपणांस न येणारे शब्द वेब्स्टरचे कोशांतूनच काढले पाहिजेत असा त्यांचा कटाक्ष असे. शिकवितांना प्रत्येक वाक्य प्रथमतः इंग्रजींत बोलून नंतर त्याचें बरोबर मराठी भाषांतर उच्चारावयाचें असा त्यांचा नियम असे. त्यांची ती करडी नजर, रोडकी पण कणखर शरीरयष्टी, पांढरा व स्वच्छ पोषाख आणि नेहमींच असलेली रागीट पण करारी मुद्रा हीं पाहून विद्यार्थ्यांचे मनांत त्यांजविषयीं प्रेमापेक्षां भयाचाच जास्त पगडा बसलेला असे.

राजवाडे यांचें आयुष्य हें शाळेंतील मास्तरकी करण्यांत जावयाचें नव्हतें. त्यांचें मन तेथें नीट लागेना. स्वतंत्र कार्य

करण्याकरितां त्यांचा जन्म झालेला होता. १८९५ मध्यें शेवटीं त्यांनीं भाषांतर हें मासिक सुरू केलें. भाषासंवर्धन करावयाचें हा त्यांचा हेतु ठरलेलाच होता. मराठी मायभाषा मी वृद्धिंगत करीन हें त्यांचें ध्येय होतेंच. जें कांहीं लिहावयाचें तें मराठींत आणण्यासाठीं त्यांनीं हें भाषांतर मासिक सुरू केलें. त्यांच्या बरोबर डेक्कन कॉलेजमध्यें शिवरामपंत परांजपे, श्री. कृ. कोल्हट-कर वगैरे होते. शिवरामपंत, दिनकर त्रिंबक चांदोरकर वगैरे मंडळीनें त्यांस सहाय्य करण्याचें ठरविलें. प्लेटो याच्या रिपब्लिक या जगन्मान्य ग्रंथाचें त्यांनीं कॉलेजमध्यें असतांच भाषांतर करून ठेविलें होतें; तें या भाषांतर मासिकांत राजवाडे प्रसिद्ध करूं लागले. दुसऱ्याही कांहीं सुंदर ग्रंथांचीं भाषांतरें प्रसिद्ध झालीं. मॉन्स्क्यू यांचें एस्प्रिट दि लाज या ग्रंथाचा तर्जुमा प्रसिद्ध झाला परंतु या भाषांतरार्थ त्यांची स्वतंत्र प्रतिभा जन्मलेली नव्हती. भाषांतराच्या, एकप्रकारें दुय्यम प्रकारच्या कामांत, त्यांच्या अनंत बुद्धिबलाचा व्यय व्हावयाचा नव्हता. यासाठीं परमेश्वर निराळीच योजना घडवून आणीत होता.

सन १८९५–९६ चे सुमारास रावबहादुर काशिनाथपंत माने यांचें पुणें येथें ‘ महाराष्ट्र इतिहासाचें महत्त्व ’ या विषयावर एक सुंदर व्याख्यान झालें व त्याचा सारांश केसरींत प्रसिद्ध झाला. या व्याख्यानाचा त्यावेळच्या पुण्यांतील विद्यार्थ्यांच्या मना-वर फार परिणाम झाला. वांई येथील रहिवाशी श्री. काकासाहेब पंडित हे त्या वेळीं पुण्यास वकिलीचा अभ्यास करण्यासाठीं होते. त्यांच्या मनावर वरील व्याख्यानाचा फार परिणाम झाला व

मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें शक्य असल्यास जमवावींत असें त्यांस वाटूं लागलें.

ज्या घरांत हे काकासाहेब राहत असत, त्या घराचे मालकानें तिसऱ्या मजल्यावरील एका भिंतींत असलेल्या अंबरांत एक जुन्या कागदांचें मोठें पेटारें टाकून दिलें होतें. त्यांतील जुने कागदपत्र एकदां वाचून पहावे असें वाटून हे काकासाहेब व त्यांचे मित्र कै. रंगो वासुदेव बोपर्डीकर यांनीं तें दप्तर चाळून पाहण्यास सुरवात केली. पहिलेंच पत्र हातीं घेतात तों, तें पत्र पानपतचे लढाईचे आधीं गोविंदपंत बुंदेले यांनीं लिहिलेलें सांपडलें. तें पत्र पाहून या उभयतां वाचकांस किती आनंद झाला असेल हें वाचकच कल्पनेनें जाणोत. पानपतच्या लढाईतील एका प्रमुख योद्ध्याचें हस्तलिखित पत्र पाहून किती आश्चर्य व धन्यता त्यांस वाटली असेल! सर्व दप्तर चाळून महत्वाचे कागद त्यांनीं बाजूस काढले. याच सुमारास प्रो. आबासाहेब काथवटे वांईस गेले होते. त्यांस ही वार्ता या उभयतांनीं हर्षभरानें निवेदन केली. ते सर्व कागद समक्ष पाहून ते महत्त्वाचे कागद रा. ब सानें किंवा विसुभाऊ राजवाडे यांजकडे पाठविण्याची त्यांनीं शिफारस केली. आबासाहेब पुण्यास गेले व त्यांनीं ती वार्ता राजवाडे यांस सांगितली; व मग काय! त्या निरलस व साक्षेपी पुरुषानें एक क्षणही वायां दवडला नाहीं. पानिपतच्या लढाई संबंधीचीं पत्रें—केवढा मोठा लाभ असें त्यांस झालें. त्याच रात्रीं राजवाडे पुण्याहून वांईस जाण्यास निघाले व जाऊन तें दप्तर पाहण्यास त्यांनीं सुरवात केली. कांहींएक विश्रांति न घेतां एकपा-

रखे सर्व कागद अथ पासून इतिपर्यंत वाचावयाचे, या प्रमाणें त्यांनी काम केलें. श्रमाची त्यांस पर्वा नसे. श्रमांसाठींच तर त्यांनीं शरीर तयार केलें होतें. दोन महिन्यांत सर्व दप्तर तपासून इतिहाससंबंधीं सर्व कागद घेऊन ते पुण्यास रवाना झाले. तेथें श्रीविठ्ठल छापखान्यांत ते कागदपत्र छापण्यास सुरवात झाली. परंतु दुर्दैवानें हा श्रीविठ्ठल छापखाना जळून गेला. हा विठ्ठल छापखाना फडके वाड्यांत होता. भाषांतर मासिकाचें सर्व संपादित कार्य खाक झालें. याच सुमारास त्यांची भार्या पण मरण पावली. संसाराचा पाश तुटला व राष्ट्रप्रपंच सुधारावयास हा महापुरुष तयार झाला.

पानिपतच्या लढाईसंबंधाचे सर्व कागद घेऊन ते वांईस आले. पुन्हां सर्व बाळबोधींत लिहून त्याचा ते अभ्यास करूं लागले. त्या पत्रांशीं त्यांची तन्मयता पूर्णपणें झालेली होती. त्यांस खाण्यापिण्याची सुद्धां आठवण नसे. पानिपतच्या प्रचंड रणसंग्रहाची साग्र सुसंगत हकीगत जमविण्यांत ते दंग झाले. सर्व कार्य कारण भाव त्यांनीं जमविले. रात्रीं, दिवसा, पहांटे, सायंकाळीं ज्या ज्या वेळीं पहावें, त्या त्या वेळीं राजवाडे त्या दप्तराचा अभ्यास करीत आहेत असेंच दिसे. झोंपबीप सर्व चट पळून गेलें. काम करितां करितां जरा दमलें असें वाटलें ह्मणजे तेथेंच डोकें टेंकून १०।१५ मिनिटें झोंपावयाचे; परंतु फिरून जागे होऊन कागदपत्र वाचूं लागावयाचे. विठ्ठलाच्या ध्यानानें तुकोबादिकांची तहान भूक जशी हरपे तसेंच या महापुरुषाचें झालें. केवळ जगण्याकरितां म्हणूनच पोटांत ते चार घांस कोंबीत व अगदीं डोळे उघडत नाहींसे झाले म्हणजेच डोकें टेंकीत. यावेळचीच आम्ही एक आख्यायिका आमच्या

लहानपणीं ऐकिली होती. त्यांस कोणी तरी म्हणाले " अहो, असे अश्रांत श्रम करून लौकर मरून जाल " त्यावर ते संतापून म्हणाले " काम करून मनुष्य मरत नाहीं; आळसानें लौकर मरतो: माझ्या आधीं तुम्हांस मीच पोंचवीन ! ! " राजवाडे यांनी असा हा नीट अभ्यास करून आपला हा पहिला खंड प्रसिद्ध केला. त्यांची या खंडास १२७ पानांची द्वादश प्रकरणात्मक अद्वितीय प्रस्तावना आहे. १८८८ पासूनच त्यांनीं या मराठ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासास पद्धतशीर आरंभ केला होता. या १० वर्षांच्या श्रमाचें फळ म्हणजे ही प्रस्तावना होय.

मोदवृत्त छापखान्यांत हा प्रथम खंड प्रसिद्ध झाला. ह्या खंडानें थोर इतिहासतत्त्वविवेचक म्हणून राजवाड्यांची सर्वत्र कीर्ति झाली. सर्वजण ही प्रस्तावना पाहून दिपून गेले. जोरदार भाषा, समर्पक सिद्धांत, इतिहासतत्त्वविवेचनाचें गाढें ज्ञान हें सर्व पाहून महाराष्ट्रीय विद्वान् लोक चकित झाले. ज्ञानकोशकार विद्यासेवकांत लिहितात " खरोखर पाहतां साहित्य-शोधन, बारीक शोध, आणि इतिहास-विकासविषयक विचार या दृष्टीनीं पाहतां अर्वाचीन इतिहासाच्या क्षेत्रांत राजवाडे यांच्या पहिल्या खंडाच्या योग्यतेचा दुसरा ग्रंथ गेल्या ५० वर्षांत हिंदुस्थानांत झालाच नाहीं. या ग्रंथामुळें त्यांस इतिहास संशोधक हें नांव मिळालें तें कायमचें टिकलें. " या ग्रंथाची प्रस्तावना इतकी गहन व गंभीर आहे कीं, ती प्रथम वाचतांना वाचक गोंधळून जातो. प्रसिद्ध रियासतकार सरदेसाई म्हणाले ' ही प्रस्तावना मीं सात वेळां वाचली, तेव्हां कोठें

मला त्यांतील म्हणणें सर्व यथार्थपणें समजलें. ' याच प्रस्तावनेंत इतिहासाचें आत्मिक व भौतिक विवेचन म्हणजे काय हें त्यांनीं विशद केलें आहे. महाराष्ट्र धर्म ह्मणजे काय याची फोड याच प्रस्तावनेंत त्यांनीं प्रथम केली व मागून तत्संबंधीं अनेक ठिकाणीं उहापोह केला. इतिहासाचें क्षेत्र किती विस्तृत आहे, इतिहास सर्वांगीण होणें म्हणजे कसा करावा, किती गोष्टींचा त्यांत अंतर्भाव होतो हें या प्रस्तावनेंत त्यांनीं सांगितलें आहे. हें सर्व सांगून मग या खंडांत प्रसिद्ध केलेल्या पत्रांच्या अनुरोधानें त्यांनीं पानपतच्या लढाईसंबंधीं सुंदर खोल विवेचन केलें आहे. पानिपतच्या लढाईंत पराभव होण्यासंबंधींचीं १८ कारणें जीं आजपर्यंत इतरांनीं कल्पिलीं तीं मांडून मग कागदपत्राच्या आधारें त्या मुद्याचें त्यांनीं सप्रमाण व बिनतोड खंडन केलें आहे. लढाईच्या खऱ्या यशापयशाचीं कारणें म्हणजे मल्हारराव होळकर यांची कुचराई व द्रोह, तसेंच गोविंदपंत बुंदेले यांची कार्यासंबंधीची उदासीनता हीं मुख्य होत असें त्यांनीं दाखविलें आहे. या तात्कालीन कारणांशिवाय मराठ्यांच्या राज्य प्रसाराबरोबर उदार विचार प्रसाराचें रामदासी कार्य कोणीं केलें नाहीं. यामुळें नवीन मिळविलेल्या साम्राज्यांतील जनतेचीं मनोगतें हातीं घेतां आलीं नाहींत; हें महत्त्वाचें अपजयाचें कारण आहे. मराठ्यांनीं साधी राहणी सोडली नाहीं. परंतु उच्च विचार सरणी व तिचा प्रसार हें सोडलें. मराठे अबुज व धिप्पाड अफगाणांसमोर लढाईस टिकत नव्हते वगैरे कारणांचा राजवाडे यांनीं नुसता धुव्वा उडविला आहे.

रशिया बरोबर जपानी लोकांची जी लढाई झाली तींत प्रचंड-काय रशियनांचा लहान जपानी वीरांनींच नक्षा उतरला व जगास चीत केलें. देह केवढा कां असेना, देहांतील देशभक्तीची ज्योत दिव्य असली म्हणजे झालें. पानिपतच्या लढाईसंबंधीं त्यावेळच्या उपलब्ध तुटक साधनांच्या जोरावर राजवाडे यांनीं जे सिद्धांत प्रस्थापित केले, ते आजहि बहुतेक अबाधित आहेत. या प्रमाणें हा अलौकिक पहिला खंड प्रसिद्ध झाला व राजवाडे यांची कीर्ति अक्षय्य उभारली गेली.

या नंतर आणखी दप्तरें शोधण्याच्या नादास ते लागले. आता तें त्यांचें पवित्र कार्यच झालें. प्रयत्न केला तर सर्व मराठ्यांचा व पर्यायानें हिंदुस्थानचा इतिहास तयार करतां येईल असें त्यांस वाटूं लागलें. मेणवली येथील दप्तराचा शोध लागला. एके दिवशीं राजवाडे एकटेच मेणवलीस जाऊन आले. परंतु त्यांस दप्तर दाखविण्यास हरकती घेण्यांत आल्यामुळें ते संतप्त झाले. शेवटीं एकदांचें दप्तर पाहण्याची त्यास परवानगी मिळाली व त्यांचें काम सुरू झालें. या ठिकाणीं राजवाडे यांच्या श्रमसातत्याची व उद्योगाची पराकाष्ठा झाली. पहांटे पांच वाजतां ते उठत. प्रातर्विधी आटोपून जे कामास लागत ते मध्यं-तरीचा वाड्यांत जेवणास वेळ लागेल तेवढाच खर्च करून, कोणा-शींही न बोलतां रात्रीं १०।११ वाजेपावेतों दप्तर पहाणीचें काम करीत. मेणवली दप्तराचें काम चालू असतां ' मी १०० वर्षें जगलों व हें मेणवली दप्तर प्रकाशनाचें काम सुरू केलें, तर माझें सर्व आयुष्य खर्च झालें तरी हें काम तडीस जाणार नाहीं ' असे उद्गार काढीत.

त्या दप्तरांतील आनंदीबाई, राघोबादादा, सखारामबापू, निजामअल्ली वगैरे इतिहासप्रसिद्ध व्यक्तींसंबंधीं दप्तरांत उपलब्ध असलेले कागद निरनिराळे बांधण्यास त्यांनीं ८० रुपये खर्च करून कापड विकत घेतलें व सर्व रुमालावर निरनिराळ्या व्यक्तींचीं नांवें घालून व्यवस्थित दप्तर लावून ठेविलें. यांना नाना नेहमीं उपयोगांत आणीत असत ते नकाशे त्यांनीं एका निराळ्याच दप्तरांत बांधून ठेविले होते. त्यांतील एक दोन नकाशे गळवठले असल्याचें आढळल्यावरून राजवाड्यांनीं चौकशीस सुरुवात केली. परंतु राजवाडे यांनीच ते चोरले असा मालकानें आरोप घेतला. स्वाभिमानी व निःस्पृह राजवाड्यांस ही गोष्ट कशी सहन होणार! अनंतश्रम करून यांचीं दप्तरें तपासा व परत ही दक्षिणा! राष्ट्राचा इतिहास तयार करूं पाहणाऱ्या पुरुषाची अशी ही पूजा! त्यांनीं मेणवली दप्तराचा नाद सोडून दिला. ज्या ज्या वेळेस त्यांस त्या दप्तराची आठवण येई. त्या त्या वेळीं त्यांचें मन उद्वेगानें भरून येई. पुढें नानाफडणीसाचें महत्त्वाचें प्रचंड दप्तर श्रीमंत शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी व पारसनीस यांचे हातीं गेलें.

याच सुमारास पारसनीस यांनीं ब्रह्मेंद्रस्वामींचें चारित्र व पत्रव्यवहार प्रसिद्ध केला. या खंडांत पारसनीस यांनीं प्रथम १०० पानांत ब्रह्मेंद्राचें जें चारित्र देण्याचा प्रयत्न केला आहे, त्यांत ब्रह्मेंद्रांस त्यांनीं रामदासांच्या पायरीस नेऊन बसविलें आहे. फार थोर जनपदहितकर्ता व सल्लागार ह्मणून त्याची महती त्यांनीं त्यांत गायिली आहे. परंतु ज्या पत्रांवरून हें चारित्र रचिलें त्यांत ब्रह्में-

द्राचें चरित्र निर्विकार दृष्टीनें पाहिलें तर खरोखर निराळें दिसतें. राजवाडे यांनीं ब्रह्मेंद्रासंबंधी अस्सल पत्रें मिळवून प्रसिद्ध केलीं व या तिसऱ्या भागांत प्रस्तावनेंत त्यांनीं ब्रह्मेंद्रांचें त्यांच्या दृष्टीनें खरें स्वरूप दाखवून दिलें. या भागाची ही प्रस्तावना अशीच फार मार्मिक आहे. ब्रह्मेंद्र स्वामी हा कळागती लाविणारा, भांडणें लावणारा, सावकारी वृत्तीचा एक सामान्य माणूस होता व राष्ट्राचें नुकसान करण्यास मात्र कारणीभूत झाला, असें राजवाडे यांनीं आपलें मत स्थापिलें. या प्रस्तावनेंत ते एके ठिकाणीं लिहितात " राष्ट्रांतील पुढारी व नेत्या पुरुषांची दानत धुतल्या तांदुळासारखी असेल तरच कल्याण होतें. " उघडच आहे " महाजनो येन गतः स पंथाः " समाजांतील नेते, त्यांचे गुरु जर ब्रह्मेंद्रासारखे चुगलखोर निघाले तर इतरांनीं त्यांचेंच अनुकरण केलें तर त्यांत नवल काय ?

राजवाडे यांची ही प्रस्तावना प्रसिद्ध झाल्यावर विविधज्ञानविस्तारांत कित्येक महिने खडाजंगी चालली होती. राजवाडे यांचें लिहिणें जरी जरा जास्त दिसलें, तरी तें यथार्थ वाटतें. ब्रह्मेंद्रास सिद्धी वगैरे असेल, परंतु विवेकानंदांनीं एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें सिद्धीच्या मार्गानें मनुष्य एकादे वेळेस अवनतीस जातो, चमत्कार करून मोठेपणा मिरवावा असें त्यास वाटूं लागतें. त्याच मासल्याचा ब्रह्मेंद्र असावा असें वाटतें. त्याच्या पत्रांत कांहींना कांहीं तरी पैसे, खाद्य पेयें यांच्या शिवाय शब्द दिसत नाहीं. असला घृतमधु सेवन करणारा व याचे पैसे घेऊन त्यास देणारा संन्यासी राष्ट्रकार्यधुरंधर रामदासांच्या पंक्तीस कोण बसवील? सावकारांच्या

दारांत कपाळ झिजत चाललें असले उद्धार निराश होऊन तो रण-पांडेत अचाट कर्तृत्वशाली बाजीराव काढतो व ब्रम्हेंद्र त्यास स्वतःच्या कर्जाचा तगादा लावितो. वाहवारे गुरु ! असो. हे मत भेदाचे प्रश्न आहेत. परंतु ब्रम्हेंद्राच्या पत्रांवरून तरी ते रामदासांच्या पासंगासही पुरणार नाहीत अशी विचारशील मनाची खात्री होते.

अशीं पत्रें जमा होत होतीं; त्यांत ओझर्डेकर पिसाळ देशमुख यांचें दप्तर मिळण्याचा संभव दिसूं लागला. कांहीं अस्सल कागद मिळालेही. हें दप्तर औरंगजेब यानें दक्षिणेकडे स्वारी केली त्यावेळचें असून त्या काळच्या इतिहासावर बराच प्रकाश पाडणार आहे. हें घराणें सुप्रसिद्ध सूर्याजी पिसाळ देशमुख यांचें असून त्यांचेशीं झालेला बादशहाचा पत्रव्यवहार या दप्तरांत आहे. सूर्याजी हा बादशहास मिळाल्यावर त्यानें स्वतःचे जातभाई जे मराठे त्यांस गनीम असें पत्रांत लिहिलेलें राजवाडे यास दिसून आले, तेव्हां राजवाडे यांस संताप आला. स्वजनद्रोहाचें भयंकर पातक करून पुन्हा त्यांस शिव्या देणें म्हणजे काय असें त्यांस वाटलें. राजवाडे यांनीं हीं पत्रें ग्रंथमालेंत प्रसिद्ध करितांना एक टीप लिहून ‘ सूर्याजी ’ हा राजद्रोही होता. असें प्रसिद्ध केलें. ही गोष्ट या घराण्यांतील मंडळीस कळल्यावर त्यांनीं राजवाडे यांस दप्तर देण्याचें साफ नाकारिलें. ते म्हणत “ हल्लींचे गायकवाड, शिंदे, होळकर, हे इंग्रजांशीं सलोख्यानें वागून त्यांच्या हितांत समरस होतात, तरी ते राष्ट्रद्रोही ठरत नाहींत, मग त्यावेळच्या असलेल्या सार्वभौम सत्तेशीं सूर्याजी

पिसाळ समरस झाल्या तर तो राष्ट्रद्रोही कसा ?" परंतु राजवाडे यांनीं आपलें म्हणणें सोडलें नाहीं; व हें दप्तर हातीं येण्याचा मार्ग खुंटला.

वाई प्रांतांत इतिहाससंबंधीं कागदपत्रें शोधीत असतां त्यांस जुनीं काव्यें वगैरेही सांपडत. जुनी ज्ञानेश्वरी त्यांस सांपडली; दासोपंताचें एक बाड सांपडलें. दासोपंताचें काव्य छापण्यासाठीं महाराष्ट्र सारस्वत म्हणून एक मासिक सुरू झालें. तें कांहीं दिवस चालू होतें.

एकदां हें संशोधनाचें काम महत्त्वाचें म्हणून पटल्यावर राजवाडे यांनीं सर्व जीवित त्यास वहावयाचें ठरविलें. ठिकठिकाणीं ते वणवण हिंडले. काशीपासून रामेश्वरपर्यंत जेथेंजेथें म्हणून कागदाचा चिटोरा मिळण्याचा संभव, तेथें तेथें ते हिंडले. ते बलुचिस्थान व अफगाणिस्थान इकडेही गेले होते. कोठें जाण्याचें त्यांनीं बाकी ठेवलें नाहीं. त्याप्रमाणें सर्व ऐतिहासिक स्थळें, किल्लेकोट, गुहा, दऱ्या, राजवाडे, शिलालेख, दुर्गें, लेणीं सर्व त्यांनीं नीट पाहिलें. सर्व महाराष्ट्र त्यांच्या डोळ्यासमोर उभा असे. कधीं कधीं या स्थाननिरीक्षणाच्या नादानें त्यांच्यावर भयंकर संकटें ही ओढवत, परंतु दैवसाहाय्यानें ते यांतून सुरक्षित बाहेर पडले. एकदां खांदेरी उंदेरी हें मुंबई जवळील समुद्रांतील ठिकाण नीट पहाण्यासाठीं म्हणून मुंबईस ते कुलाबादांडी जवळ ओहटी होती, तेव्हां गेले व सर्व प्रदेश नीट न्याहाळून पहात होते. रात्र होत आली व भरती लागण्याची वेळ आहे, याकडे त्यांचें लक्षच नव्हतें. पहारेकरी म्हणाला 'येथें रात्रीचें राहावयाचें नाहीं.' शेवटीं पाण्यांतून पोहत जावयाचें त्यांनीं

ठरविलें. त्यांच्या बरोबर एक मुसलमान खलाशी येण्यास तयार झाला, परंतु मार्गांत त्या भरतींत त्या मुसलमानानें चकाविलें. मुंबईस त्यावेळीं हिंदुमुसलमानांचे दंगे चालू होते. त्या मुसलमानानें तर हातावर तुरी दिल्या. समुद्रांत लाटाशीं दोन हात खेळत हा पठ्या मारखा पुढें येत होता. परंतु कोठे जातों हें कळेना. इतक्यांत त्यांस एक अंधुक दिवा दिसला. त्या दिव्याच्या आधारानें ते चालले. एक कोळी जाळें पसरून मासे पकडीत होता. राजवाडे खूप मोठ्यानें ओरडले. कोणी तरी पाण्यांत पोहून येण्याची धडपड करीत आहे हें त्या कोळ्यानें ताडलें व त्यानें आपलें जाळें खूप दूरवर फेंकलें. त्या जाळ्याच्या आधारानें राजवाडे किनाऱ्यावर आले. त्या कोळ्यानें त्यास घरीं नेऊन पोंचविलें. राजवाडे यांनीं त्यास चांगलें बक्षीस दिलें हें सांगण्याची जरुरी नाहीं. सुदैव महाराष्ट्राचें व भरतवर्षाचें कीं, त्या काळाच्या जबड्यांतून हा थोर पुरुष बचावला. अशाप्रकारें सर्व जागा त्यांनी डोळ्यांखालून घातल्या. पुण्याची माहिती तर त्यांच्या इतकी कोणासच नव्हती. कोणत्या ठिकाणीं कोण होते, काय होतें सर्व ते सांगत. ते कोंकण प्रांतींही गेले होते व तिकडेही त्यांनीं संशोधन केलें. कोंकण प्रांतांतील लोकांसंबंधी ते लिहितात " कोंकणांतील ब्राम्हण, मराठे, भंडारी वगैरे लोक मोठे चलाख, उद्योगी, शीघ्रबुद्धि, धाडसी व श्रमसाहस करणारे असलेले मला दिसले. ह्यांच्यांत मध्यम व उच्च शिक्षणाचा प्रसार झाल्यास एकंदर महाराष्ट्रांतील समाजाची प्रगति जास्त वेगानें होईल, असा माझा ग्रह झाला. ह्या लोकांत Naval Architecture चें एखादें स्कूल व उच्च शिक्षणार्थ एखादें तरी सर्वसाधनसंपन्न

कॉलेज स्थापिल्यास, येथून धाडसी व सुशिक्षित नावाडी व कुशाग्र विद्वान् निपजण्याचा संभव आहे." अशाप्रकारें जेथें जातील तेथें सूक्ष्म बुद्धीनें सर्व पहात. पत्रें वगैरे मिळविण्यास त्यांस कशी मारामार पडे. याचें त्यांनीच आपल्या एका खंडाच्या प्रस्तावनेंत वर्णन केलें आहे. कनक व कांता यांस जिंकून, मानापमानाचें गांठोडें बांधून ठेवून, आशोस फार सैल न सोडतां, सतराशें खेटे घालावयास लागले तरी तयार असणें वगैरे गोष्टी संशोधकास पाहिजेत. एखादे वेळी उन्हातान्हांतून जावें व पत्रें दाखवूं नये. असेंही होईल असें ते सांगत. कारण स्वतः त्यांस कऱ्हाड मुक्कामीं असतां असे कटु अनुभव आले होते. दप्तरें झाडून साफ करावयाचीं, धुळीनें नाकपुड्या भरून जावयाच्या; कोळिष्टकांनीं डोकें भरून जावयाचें; या सर्व धुळवडीस तयार असलें पाहिजे, तर पत्रलाभ होईल. असें ते म्हणत. पुन्हा कधीं कधीं पत्रें मिळत त्यांचे गठ्ठे वाळूनें खाल्लेले अगर पावसानें एकत्र झालेले असे असावयाचे. सातव्या खंडाचे संपादक आपल्या प्रस्तावनेंत लिहितात. "हीं इतिहासाचीं साधनें अश्रांत परिश्रमानें कधीं उकिरड्यांतून तर कधीं उकिरडे वजा झालेल्या जुन्या वाड्यांतील तळघरांतून अथवा कधीही वापरांत नसलेल्या तिसऱ्या, चवथ्या मजल्याच्या माळ्यावरून—उन्हाळ्यांतील कडक ऊन, पावसाळ्यांतील पाऊस व हिंवाळ्यांतील थंडीचे कडके खाऊन, कडकून, भिजून आणि फिरून आकर्षून—केर कचरा व वाळवी यांच्या अखंड मैत्रींत 'कालोह्ययं निरवधिर्विपुलाच पृथ्वी" या भवभूतीच्या उक्तीवर विश्वास टाकून बसलेलीं अशीं रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे बी. ए. यांसारखे पदवीधर उजेडांत आणीत आहेत; त्यांना

अभ्यंग स्नानें घालीत आहेत; त्यांचे रोगग्रस्त भाग प्रसंगीं कळ-
कळीच्या मत्राळेनें सुसज्ञ होणाऱ्या शस्त्रकारांनीं कापून काढून
निराळे करीत आहेत; कित्येक ठिकाणीं मलमें लावीत आहेत; तर
कित्येक ठिकाणीं नवे अवयवही कृत्रिम तऱ्हेनें बनवून चिकटवीत
आहेत व जुन्यांस रजा देत आहेत. ह्या सर्व गोष्टी केवळ कवि-
कल्पना वाटण्याचा पुष्कळ संभव आहे, परंतु ज्यांनीं हे पत्रांचे
गठ्ठे स्वतां पाहिले आहेत, त्यांस तसें वाटण्याचें कारण नाहीं. तीन-
चार पुस्तकें वाळवीनें इतकीं खाल्लीं आहेत कीं, त्या वाळवीच्या
किड्यांच्या मृत शरीराची माती त्या पुस्तकांत भिनून एकंदर पुस्त-
काची माती—कां ? दगडी पाटीच बनली आहे. अशा स्थितींत अस-
लेलीं हीं पुस्तकें फिरून बोलकीं करावयास प्रथम त्यांस युक्तीनें
वाफारा द्यावा लागतो. हा वाफारा देतांच त्या प्रस्ताराचे पापुद्रे
कांहींसे सुटे होतात. ते तसे सुटे झाल्यावर लगेच गर्भाशयांतील
शस्त्रक्रियेच्या प्रसंगीं जितक्या हलक्या हातानें आणि काळजीपूर्वक
काम करावें लागतें, त्यापेक्षांही अधिक हलक्या हातानें आणि कळ-
कळीनें त्या प्रस्तरप्राय पुस्तकाचें एक एक पृष्ठ सोडवावें लागतें.
अशीं हीं सोडविलेलीं पृष्ठें फिरून चिकटूं नयेत म्हणून त्यांच्या-
मध्यें एक एक टिप कागदाचें किंवा साध्याही कागदाचें पृष्ठ घालून
ठेवावें लागतें. इतकें करूनही हीं पृष्ठें आपलें सर्व हृद्गत बोलून
दाखविण्यास समर्थ होत नाहींत. इतकेंच नव्हे, तर कित्येक अगदीं
निरक्षर म्हणजे मुकीं झालेलींच जेव्हां आढळतात, तेव्हां मनाला किती
उदासवाणें वाटत असेल, याची कल्पनाच करणें बरें"
याच प्रस्तावनेंत द्रव्यसाहाय्य करण्याबद्दल सर्व जनतेस मोठी

कळकळयाची विनंती केली आहे. या विनंतीपणों कांहीं साहाय्य मिळालें. चिपळूण येथील एका गृहस्थानें मुद्दाम चार आणे या कार्यास पाठविले होते. परंतु पत्रें ज्या मानानें मिळत गेलीं त्या मानानें प्रकाशन झालें नाहीं. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें या नांवानें त्यांनीं २२ खंड प्रसिद्ध केले. तरीसुद्धां ५० हजार पत्रें त्यांच्या जवळ राहिलींच हे सर्व काम राजे महाराजे, सरदार दरकदार यांच्या मदतीशिवाय कसें व्हावें? राजवाडे संतापून आपल्या प्रस्तावनेंत एके ठिकाणीं लिहितात 'साधनें प्रकाशण्यासंबंधानें एक चमत्कार आज कित्येक वर्षे मी निमूटपणें पाहात आहें; तो असा कीं, शिंदे, होळकर, गायकवाड, आंग्रे, पटवर्धन, विंचूरकर, पवार, राजबहाद्दर, कोल्हापूरकर, तंजावरकर, फडणीस, प्रतिनिधी, फलटणकर, भोरकर, जतकर, हैद्राबादकर, जयपूरकर, जोधपूरकर, सागरकर व इतर लहान मोठे संस्थानिक, जहागिरदार, इनामदार, देवस्थानवाले, व पूर्वीचे मुत्सद्दी हे अद्यापपर्यंत काय करीत आहेत? त्यांचीं दप्तरें किंवा त्यांच्या संबंधाचे कागदपत्र आमच्या सारख्या भिकाऱ्यांनीं शोधण्याचा व छापण्याचा प्रयत्न करावा आणि त्यांच्यासारख्या श्रीमंतांनीं अगदींच उदासीन व व निद्रिस्थ असावें, हा कोठला न्याय? काय, त्यांचे पूर्वज त्यांचे कोणी नव्हत? पूर्वजांनीं संपादिलेल्या जहागिरी व राज्यें भोगण्यास राजी आणि त्यांचे पराक्रम व इतिहास जाणण्यास गैरराजी, हा न्याय पृथ्वीवर इतर कोठेंही पहावयास मिळावयाचा नाहीं. वासुदेव शास्त्री खऱ्यांनीं आपलें घरदार विकून

पटवर्धनी दप्तर छापावें आणि मिरजकर, सांगलीकर, जमखिंडीकर ह्यांनीं खुशाल झोपा काढच्या; शिवाजी महाराज, दमाजी गायकवाड, परशुराम भाऊ पटवर्धन हे आम्हां संशोधकांचे आजे पणजे आहेत आणि संस्थानिकांचे कोणी नाहींत, असेंच म्हणावयाची पाळी आली. संस्थानिकांची व इनामदारांची आपल्या प्रत्यक्ष पूर्वजांसंबंधानें केवढी ही विस्मृति! केवढा हा अपराध ! ही भरतभूमि पितृपूजेविषयीं प्रख्यात आहे. तींत प्रस्तुत काळीं पितरांची अशी वेळ व्हावीना ? असो. राजे निजले आहेत, जहागिरदार डुलक्या घेत आहेत, आणि इनामदार झोंपा काढीत आहेत. ते जागे होईपर्यंत, जागे झालेल मध्यम स्थितींतील जे आपण, त्यांनीं राष्ट्राच्या या पितरांचें स्मरण कायम ठेविलें पाहिजे. आपलें सामर्थ्य अद्यापि जुजबी आहे, तथापि ह्या पुण्य कर्माप्रीत्यर्थ तें खर्चिलें पाहिजे.'

राजवाडे यांचे पत्रें वगैरे प्रसिद्ध करण्याचें काम कै. विजापूरकर यांची ग्रंथमाला करीत होती त्यांच्या मार्मिक व मुद्देसूद प्रस्तावना याच ग्रंथमालेंतून प्रसिद्ध झाल्या व त्यांच्या वर वाचकांच्या उड्या पडत. विजापूरकर व राजवाडे दोघे एकमेकांस साहाय्य करते झाले. विजापूरकरांस राजवाड्यांचें कर्तृत्व कळलें होतें व त्यांच्या स्वभावाशीं ते नीट जमवून घेत. परंतु पुढें विजापूरकर कैदेंत गेले. त्यांचीं मासिकें बुडालीं; सरस्वतिमंदिर हें द्रव्याभावीं बंद पडलें. पारसनीस यांचें इतिहास संग्रह चाललें होतें; परंतु राजवाडे व पारसनीस यांचें फारसें सख्य

नसे. तेव्हां आपलीं टांचणें, टिपणें प्रसिद्ध करण्यास एखादें मंडळ काढावें असें ठरलें. संघटित प्रयत्न व्हावे असें त्याच्या मनानें घेतलें. शके १८२७ मध्यें सहाव्या खंडाच्या प्रस्तावनेंत आरंभीं ह्या इतिहास संशोधक मंडळाची आवश्यकता प्रथम त्यांनीं पुढें मांडिली. नंतर राष्ट्रोदयांत त्यांनीं पुनरपि ही कल्पना जाहीर केली.

आपल्या कल्पनेचा नीट पुरस्कार केला जात नाहीं याचें त्यांस वाईट वाटलें. एक दिवस रात्रीं पांढरी घोंगडी पांघरून व ढोंपरापर्यंत लहानशी धाबळी नेसलेले असे राजवाडे सरदार तात्या-साहेब मेहेंदळे यांचेकडे आले व म्हणाले "हें इतिहासाचें काम आतां मरतें; तेव्हां तुम्ही त्यास कांहीं द्रव्य खर्चतां का व कांहीं मेहनत करतां का?" त्यादिवशीं कांहीं चर्चा झाली. खरे, पारस-नीस, भावे, देव वगैरे संशोधन चालवीत होते. त्यावेळेस पुण्यास राजकारण व सामाजिक सुधारणा यांमुळें पक्षोपपक्षांची बजबज-पुरी माजली होती. यामुळें या पंथहीन कामांत कोणी लक्ष देईना. शेवटीं या सर्व दिरंगाईस राजवाडे कंटाळले व ते मेहेंदळे यांस म्हणाले " आज आपण दोघां मिळूनच सभा स्थापन झाल्याचें जाहीर करूं या. आपल्या दोघांचा एक विचार होण्यास इतके दिवस लागले तर सर्वांचा एकसूत्री विचार होण्यास किती काळ लागावा?" गणेश व्यंकटेश जोशी, गणपतराव जोशी, मेहेंदळे, राजवाडे, व मातु अशी पहिल्या वेळची, दिवशींची सभासद मंडळी. गुरुपुष्य नक्षत्र योग असा पवित्र दिवस पाहून मंडळ स्थापन झालें. त्या दिवशीं 'कर्तरित्रय' हा निबंध राजवाडे यांनीं वाचला. मंडळ स्थापन झालें. सभासदही वाढूं लागले. व मंडळानें काम जोरानें

सुरू झालें. शके १८३९ मध्यें प्रथम संमेलन झालें व त्यांत महत्त्वाचे ठराव पसार करण्यांत आले. यावेळचें अध्यक्षस्थान प्रसिद्ध इतिहास संशोधक व प्रकाशक रा. ब. काशिनाथ नारायण साने यांस देण्यांत आलें होतें. त्यांनीं त्या काळपर्यंत झालेल्या सर्व संशोधनाचा आढावा घेतला व " झालेलें काम विस्कळित झालें; आतां सुसंघटित काम करणें या मंडळामार्फत होईल तें स्पृहणीय आहे " म्हणून सांगितलें.

या सभेंत रा. देव यांनी वर्गणी जमविण्यासंबंधींचा ठराव मांडला. संशोधकास द्रव्यसाहाय्य करण्यासाठी हें द्रव्य विनियोगांत आणावयाचें होतें. या ठरावावर राजवाडे यांनीं पुढील भाषण केलें. रा. कीर्तने यांची बखरीवरील टीका प्रसिद्ध झाल्यावर विविधज्ञानविस्तारांतून दोन बखरी प्रसिद्ध झाल्या. त्यानंतर आपले सन्माननीय अध्यक्ष यांनीं कोणापासूनही कसल्याहि मदतीची अपेक्षा न करितां ४०।४२ बखरी छापिल्या. त्यानंतर मिरजेचे रा. खरे आले. त्यांनीं आपलें घरदार विकून पटवर्धनी दप्तर छापण्याचा स्तुत्य उद्योग सुरू केला. रा. ब. पारसनीस हे आपला संसार करून हें कार्य करीत आहेत. मीहि माझ्या मित्रांच्या मदतीनें वर्षादोनवर्षांनीं एखादा खंड काढितों. परंतु हे सर्व प्रयत्न सर्वांशीं तुटक झाले व या कार्यांत आम्हांस त्यावेळीं प्रसिद्ध असलेल्या अशा कोणाहि मोठ्या मनुष्याचें अगर संस्थानिकाचें अगर इतर कोणाचें साहाय्य झालें नाहीं. आम्हां प्रत्येकास कागदपत्र हुडकून काढण्यापासून तों पुस्तकें विकून पैसे वसूल करीपर्यंतच्या सर्व विवंचना कराव्या लागल्या आहेत. यामुळें वेळाचा किती तरी अपव्यय

होतो व प्रगति तर अति मंदगतीनें होते. तेव्हां आपला झाला परंतु आपणांसाठीमागून जे गृहस्थ हें कार्य करण्यास प्रवृत्त होतील त्यांच्या काळाचा अपव्यय होऊन आयुष्य फुकट जाऊं नये व कार्य तर त्वरित व्हावें अशासाठीं काय योजना निर्माण करावी या चिंतनेंत मी असतां माझे व मेहेंदळे यांची गांठ पडली, व चमत्कार असा कीं, त्यांनींच होऊन मला विचारिलें कीं, संघटित स्वरूपाचें काम करण्यासारखी एखादी संस्था निर्माण करितां येईल का ? वस्तुतः हें इतिहासाचें काम पूर्वीच्या इतिहासप्रसिद्ध लोकांच्या वंशजांचें आहे. हें एक प्रकारचें पितृकार्य आहे; व तें करण्यास त्यांच्यांतीलच एक मनुष्य तयार झाल्याचें पाहून मला आनंद झाला. अशा रीतीनें आम्हां उभयतांच्या विचारानें व आपले पहिले अध्यक्ष रा. ब. गणपतराव जोशी व आपले सध्यांचे सन्मानीय अध्यक्ष यांच्या प्रोत्साहनानें सदरहू संस्था स्थापन झाली. रा. ब. रानडे यांनीं अनेक संस्था निर्माण केल्या. परंतु त्यांनीं आपल्या मंडळासारखी संस्था निर्माण केली नाहीं हें खरोखरीच आपलें, आपल्या देशाचें दुर्दैव होय. अशी जर एखादी संस्था त्यावेळीं निर्माण झाली असती व जर अशा संस्थेच्या कृपेच्या छत्राखालीं माझ्या सारख्यास काम करावयास मिळून जितकें जरूर तितकें स्वास्थ्य असतें तर आपणांस अतिशयोक्ति वाटेल म्हणून सहस्रपट म्हणत नाहीं पण शतपट काम मीं सहज उरकलें असतें. यद्यपि आपण आजवर केलेलें काम अति अल्प आहे, तरी संशोधकांनीं आपली जबाबदारी ओळखून सुव्यवस्थितपणें काम केलें तर आपण खचित हें कार्य लवकरच चांगल्या नांवारूपास आणूं. यद्यपि माझी

प्राप्ति अति अल्प आहे वस्तुतः कांहीं नाहीं म्हटलें तरी चालेल. परंतु माझ्या बंधूंच्या कृपेनें मला जो अल्पस्वल्प पैसा मिळतो त्यांतून माझ्या पाठीमागून होणाऱ्या संशोधकांचा मार्ग सुलभ व्हावा म्हणून मी सालीना २५ रुपये ह्या कार्यास देतों. " यात्र संमेलनासममोर राजवाडे यांनीं आणखी एक ठराव मांडला. " भारतेतिहास, भारतीय अर्थशास्त्र, भारतीय राजधर्मशास्त्र, भारतीय समाजशास्त्र, भारतीय भाषाशास्त्र वगैरेंच्या अध्ययन अध्यापनाची व्यवस्था भरतखंडांत, तेथील विश्वविद्यालयादि संस्थांच्याद्वारां होणें अत्यवश्यक आहे असें या मंडळाचें मत आहे व या आशयाचीं सूचनापत्रें, विनंतिपत्रें वगैरे निरनिराळ्या विद्यमान नामांकित शिक्षणसंस्थाकडे पाठवावीं. "

रा. मेहेंदळे यांनीं याप्रसंगीं राजवाडे यांच्या हातून मराठी भाषेचें ऐतिहासिक व्याकरण व्हावें असें सुचविलें व म्हणाले, ' तें छापून काढण्याची जबाबदारी मी आपल्या एकट्याचे शिरावर घेतों ' या गोष्टीस राजवाडे यांनीं जवळ जवळ संमति दिली होती. मराठ्यांचा इतिहासही राजवाडे यांनीं लिहावा, मी तो छापण्याची जबाबदारी घेतों असें पुनरपि त्यांनीं सुचविलें तेव्हां राजवाडे म्हणाले " पेशवाईचा इतिहास लिहिण्याजोगी सामग्री आतां खरोरीच झाली आहे. तरी मजपेक्षां दुसऱ्या कोणी तरी हें काम करावें. विद्यापीठांतून शिकविणाऱ्या विद्वान् लोकांनीं आतां आळस झाडून सर्व इतर अडचणींना न जुमानतां हें काम अवश्य करावें; असले प्रयत्न १०।१२ निरनिराळे झाले तरी दृष्टिभेदामुळें इष्टच असल्याचें सांगून या बाबतींत सक्ति न करितां खुशीवरच सोंपविणें बरें. "

अशाप्रकारें हें पहिलें संमेलन पार पडलें. भारतइतिहास संशोधक मंडळाचीं इतिवृत्तें प्रसिद्ध होऊं लागलीं. सभासद वाढूं लागले. १८३९ पर्यंत मंडळाचें काम जोरानें चाललें. राजवाडे कोठेंही असले तरी पदरचे पैसे खर्चून मंडळाच्या सभांस होतां होईतों हजर राहत. कित्येक दिवस मंडळाचें अपत्याप्रमाणें त्यांनीं संगोपन केलें. परंतु शके १८३९ नंतर त्यांचें मन या संस्थेवरून उठलें व त्यांनीं आपला तिन्हाइतपणा पुन्हा पत्करिला. पुढें धुळें येथें जी सत्कार्योत्तेजक सभा स्थापन झाली होती, त्या बाजूस ते जास्त रमूं लागले. तेथील प्रभात मासिकांत त्यांनीं लेख लिहिले. नंतर अमळनेर येथेंहि एक इतिहास संशोधक मंडळ स्थापन करण्यांत आलें. अमळनेर येथें त्या वेळेस प्रो. भानू हे होते. अमळनेरचे सुप्रसिद्ध वकील विष्णु काशिनाथ भागवत ह्यांचा उत्साह या बाबतींत फार. राजवाडे येथील सभांस नेहमीं येत व कांहीं उद्बोधक निबंध, टांचणें वगैरे वाचीत. पुढें हें अमळनेरचें मंडळ बंद पडलें. पुण्याचें मंडळ मात्र आतां मोडण्याच्या भीतीच्या पलीकडे गेलें आहे. स्वतःची सुंदर इमारतही मंडळानें आतां बांधली आहे. व राजवाडे यांनीं ती आपल्या हयातींत पाहिली पण होती.

पुण्यास जी ही इतिहाससंशोधक संस्था स्थापन झाली, तिच्या कार्याची रूपरेखा ठरविण्यांत आली होती. ( १ ) सर्व पक्षांच्या लोकांस मंडळ खुलें असावें. ( २ ) मंडळांत जें बोलणें अगर लिहिणें तें लेखी असावें. ( ३ ) Fact finding वर भर असावा. मतप्रकाशन त्यावेळेस बाजूस ठेवून दिलें होतें. मंडळांत मनमिळाऊ माणसें सामील झाल्यामुळें जहाल, मवाळ उभय पक्षांतील मंडळीही या संस्थेच्या वाढीस हातभार लावीत.

इतिहास साधनें प्रसिद्ध करण्यासाठीं अशी आटाआटी या महापुरुषानें केली. सतत श्रम करून २२ पत्र. खंड त्यांनीं छापले व कांहीं भागांस सागराप्रमाणें गंभीर व भारदस्त प्रस्तावना लिहिल्या. या पत्रखंडांशिवाय महिकावतीची बखर, राधामाधवविलासचंपू या दोहोंचा या इतिहास शोधनांतच समावेश करणें इष्ट आहे. महिकावतीची बखर यास त्यांची फारच गुंतागुंतीच्या प्रश्नांवर प्रकाश पाडणारी प्रस्तावना आहे. गुजराथ, कोंकण, वगैरेंचा इतिहास, रामदेवराव जाधव यांच्या पूर्वीचा व तदुत्तर इतिहास यांसंबंधी राजकीय सामाजिक विवेचन या प्रस्तावनेंत आलें आहे. राधामाधवविलासचंपूची प्रस्तावना म्हणजे फारच मोठें काम आहे महाराष्ट्रभूषण शहाजीच्या कर्तबगारीचें सुंदर व भव्य चित्र येथें राजवाडे यांनीं रेखाटलें आहे. शहाजीच्या पराक्रमाचे पवाडे वाचतांना मनांत आनंद होतो. लढायांचीं वर्णनें वाचतांनां तन्मयता होते. ' पाखरांच्या पाखांवर पावसाळ्यांत जेथें शेवाळ उगवतें ' असें सुंदर वर्णन वाचून सार्थकता वाटते. मराठ्यांच्या गुण दोषांची चर्चा येथेंही आहे. पहिल्या १२५ पानांत शहाजीसंबंधीं, रामदासांसंबंधीं वगैरे सूक्ष्म व गंभीर चर्चा आहे. पुढें पाणिनीय कालापासून शहाजी कालापर्यंतच्या भारतीय क्षात्रांचा परंपरित इतिहास देण्याची प्रतिज्ञा करून तत्सिध्यर्थ उरलेलीं ७० पानें खर्चीं घातलीं आहेत. यांचें परीक्षण करणें म्हणजे प्रतिराजवाडे–दुसरे गाढे पंडित पाहिजेत. आम्ही नुसता उल्लेख करणें हेंच योग्य.

राजवाडे यांच्या या इतिहास विषयक कामगिरीचा हा इतिहास. याशिवाय इतिहासासंबंधीं शेकडों टांचणें, टिपणें मंडळाच्या

इतिवृत्तांतून प्रसिद्ध झालेली जमेस धरली, म्हणजे केवढें प्रचंड कार्य या थोर पुरुषानें केलें हें दिसून येईल. या प्रस्तावनांतून जे मननीय विचार त्यांनीं प्रगट केले आहेत ते स्वतः वाचावे. आम्ही पुढें त्यांचीं मतें वगैरे सांगतांना थोडा फार त्यांचा उल्लेख करूं. ऐतिहासिक काम पाहिल्यानंतर आपण त्यांच्या भाषाविषयक कामगिरीकडे वळूं या.

---

## प्रकरण ३ रें



# भाषाविषयक कामगिरी.



साहित्यशोधक या नात्यानें राजवाडे यांनीं जें केलें, तें फार लोकोत्तर आहे यांत वाद नाहीं; परंतु ज्ञानकोशकार म्हणतात, " राजवाड्यांची भाषाशास्त्रविषयक कामगिरी लक्षांत घेतली तर तीपुढें अनेक मोठमोठ्या अभ्यासकांचे प्रयत्न फिके पडतील. राजवाड्यांच्या अनेक कामगिऱ्यांपैकीं सर्वांत अधिक मोठी कोणती हें ठरवून राजवाड्यांचें वर्णन करावयाचें झालें तर त्यांस भाषाशास्त्रज्ञ म्हणावें लागेल आणि त्यांची गणना अत्यंत मोठ्या वैय्याकरणांत करावी लागेल. हेमचंद्र आणि वररुचि यांचे प्रयत्न राजवाड्यांच्या प्रयत्नांच्या दृष्टीनें कांहींच नाहींत. इतिहासाचार्य किंवा इतिहाससंशोधक हें नांव राजवाड्यांस देण्यांत आपण त्यांच्या कार्याचें अज्ञान दाखवूं. त्यांच्या बौद्धिक कार्यानें गुरुलघुत्व माझ्या-मतें १ भाषाशास्त्र हा, २ वैय्याकरण, ३ शब्द संग्राहक व ४ इतिहास संशोधक या अनुक्रमानें आहे "

ज्ञानकोशकारांनीं केलेलें हें गुरुलघुत्व कोणाहि विचारवंत

माणसास पटण्यासारखेंच आहे. राजवाडे यांची बुद्धि स्वभावतःच संशोधन प्रवण. इतिहासाच्या संशोधनानें त्यांची ही बुद्धि कमावली जाऊन विशाल व प्रगल्भ झाली. इतिहाससंशोधक क्षेत्रांत दुसरे गडी उतरलेले पाहून राजवाडे हे इतिहास संशोधनाचें संकुचित काम संपवून शब्दांची परंपरा व इतिहास हे शोधण्याकडे वळले. अफाट अशा वाणीच्या क्षेत्रांत त्यांची बुद्धि संचार करूं लागली.

आपल्याकडे मराठीकडे प्रसिद्ध भाषाशास्त्रही म्हणून प्रथम भांडारकर डोळ्यांसमोर येतात. त्यांचीं १८७७ मध्यें संस्कृत प्राकृतसंबंधीं अत्यंत विद्वत्ताप्रचुर अशीं व्याख्यानें झालीं. निरनिराळे विभक्तिप्रत्यय यांच्या उत्पत्ति संबंधीं यांत पुष्कळ संशोधन आहे. भाषाशास्त्राचा मराठींत हा पहिला भर भक्कम पाया राजाराम शास्त्री या पुरुषानें घातला. या विद्वान् व नवमत पुरस्कारक पुरुषानें भाषेसंबंधीं अनेक लेख लिहिले. विशेषतः वेदांतील निरनिराळ्या शब्दाचे अर्थ करण्यासंबंधीचे यांचे इंग्रजी व मराठी लेख आहेत. महादेव मोरेश्वर कुंटे हेही प्रसिद्ध व्युत्पन्न. राजवाडे यांनीं भांडारकरांपासून शिलालेख शोधन आणि भाषाशास्त्र हीं घेतलीं. कुंट्यांपासून पुराण वस्तुनिरीक्षण, तुलनात्मक अभ्यास, संस्कृतबद्दलची आवड वगैरे गोष्टी उचलल्या जुन्याकडे नव्या दृष्टीनें पाहणें, पुराणांतील भाकड कथांचें अवगुंठन काढून आंतील ऐतिहासिक सत्य संशोधणें व आपलीं मतें स्पष्टपणें व निर्भीडपणें मांडणें हें राजाराम शास्त्री भागवतांचें काम राजवाडे यांनीं उचललें. भाषेसंबंधींचे सर्व विचार व प्रमेयें, आठव्या खंडाची प्रस्तावना, ज्ञानेश्वरी, तिचा नववा अध्याय व व्याकरण, सुबंत विचार व तिंगंत विचार, गुणवृद्धि,

कारप्रत्यय, संस्कृत भाषेचा उलगडा, राधामाधवविलासचंपू या ग्रंथांत प्रसिद्ध झालेलीं आहेत भाषाशास्त्रांत अनेक महत्त्वाच्या गोष्टींचा अंतर्भाव होतो; ध्वनिप्रक्रिया, वर्णप्रक्रिया, प्रत्यय चिकित्सा, अर्थप्रक्रिया, प्रयोगक्रिया वगैरे गोष्टींचा भाषाशास्त्रांत अभ्यास केला जातो. ध्वनिप्रक्रियेचें कांहीं विवेचन संस्कृत भाषेचा उलगडा व वृद्धीचा निबंध यांत त्यांनीं केलें आहे. यासंबंधीं जास्त विवेचन व विवरण ते जो नवीन धातुपाठ तयार करीत होते, त्यांत येणार होतें. " आचार्य पाणिनीनें वृद्धिरादैच् असें सूत्र बांधून वृद्धीचा चमत्कार फक्त नमूद केला पण त्याची उपपत्ति राहिली. अ, इ, उ, ऋ यांचे आ, ऐ, औ, आर् इत्यादि उच्चार होण्याची कारण-परंपरा, उच्चार करितांना मुखांतील स्नायूंच्या होणाऱ्या हालचाली, स्वरोच्चाराच्या ऐतिहासिक स्वरूपासंबंधींचीं अनुमानें इत्यादि मुद्यांचा विचार ' वृद्धी ' या निबंधांत करून त्यांनीं प्रक्रिया विशद केली आहे. नाम सर्वनामांच्या विभक्ति साधनिकेंत विकल्पानें सांपडणाऱ्या रूपांचा ऐतिहासिक अर्थ काय असावा हें पाश्चात्यांसही गूढ होतें. पाश्चात्यांस शब्दांच्या मूळ रूपाशीं जातां आलें नाहीं. अहम्, त्वम्, इत्यादि सर्वनामें भाषेचीं आद्य प्रतीकें असावींत असा तर्क मोक्षमुलरनें केला, पण त्यांची उपपत्ति व पूर्व स्वरूपें त्यांस देतां आलीं नाहींत. " राजवाडे यांनीं संस्कृत भाषेचा उलगडा या निबंधांत या सर्व गोष्टींचा विचार केला आहे. संस्कृत भाषेचा उलगडा हा निबंध खरें पाहिलें तर फारच गहन आहे. राजवाडे भाषेसंबंधीं हे सिद्धांत मनांत रचित होते. त्याच सुमारास दामले यांचें मराठी भाषेचें शास्त्रीय व्याकरण हा बडा ९०० पानांचा ग्रंथ बाहेर पडला.

त्या ग्रंथांचें परीक्षण म्हणून राजवाड्यांनीं हे आपले भाषेसंबंधींचे कांहीं सिद्धांत प्रसिद्ध केले. त्यांचें परीक्षण करून त्यांची शहानिशा करणें हें काम महाराष्ट्रांत चिंतामणराव वैद्याशिवाय कोणासही झालें नाहीं.

जुनी ज्ञानेश्वरीची प्रत सांपडल्यानंतर राजवाडे यांस अभूतपूर्व आनंद झाला. या ज्ञानेश्वरीस १०० पानांची त्यांनीं प्रस्तावना जोडली आहे. पुढें ज्ञानेश्वरीचें व्याकरण हा महत्वाचा ग्रंथ त्यांनीं केला. मराठींतील पहिलें ऐतिहासिक असें व्याकरण हेंच होय. ज्ञानेश्वरीच्या व्याकरणानें विद्वानांत फार खळबळ उडाली. लोकमान्यांनीं केसरींत अग्रलेख लिहून व वैद्यांची परिक्षिणात्मक लेखमाला प्रसिद्ध करून या ग्रंथाचा गौरव केला. चिंतामणराव वैद्य यांनीं या ग्रंथांचें नीट परीक्षण केलें. पाणिनि, पतंजलि, भर्तृहरी, वामन यांची परंपरा राजवाडे यांनीं बुडूं दिली नाहीं. ग्रंथ शुद्ध व शास्त्रीय स्वरूपाचा आहे. ज्ञानेश्वरीचें व्याकरण रचल्यानंतर ते दुसऱ्या महत्त्वाच्या कामास लागले. तें म्हणजे मराठी भाषेचा धातुपाठ हें होय. जवळजवळ ३० हजार धातु त्यांनीं गोळा केले व त्यांची प्रक्रिया, व्युत्पत्ति वगैरे उलगडण्याचा त्यांनीं जंगी खटाटोप केला. या धातुकोशाचीं हजार पानें होऊन त्यास ९०० पानांची भलीमोठी विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना पण जोडण्यांत येणार होती. या धातूंचा पहिला कच्चा खर्डा १९२० मध्येंच त्यांनीं तयार केला होता व सारखी उत्तरोत्तर त्यांत भर पडत होती व सुधारणा करणें चालू होतें. परंतु आतां या सर्व गोष्टी तशाच राहिल्या. त्यांच्या हातून हें काम झालें असतें तर मराठीस केवढा अपूर्व लाभ झाला असता !

इतर सर्व भाषांकडे या एकाच अभिनव गोष्टीनें, तुच्छतेनें पाहण्यास मराठीस सामर्थ्य आलें असतें—परंतु दैवदुर्विलास महाराष्ट्राचा. दुसरें काय ?

भाषेचा व भाषेंतील शब्दांचा अभ्यास त्यांस फार आवडे. अलीकडे ९।१० वर्षे कागदी साधनांचा त्यांनीं नाद सोडून दिला होता व नैमित्तिक साधनांचाच, या भाषाविषयक साधनसामुग्रीचाच इतिहासाच्या कामीं ते उपयोग करून घेऊं लागले होते. वेदपूर्व कालापासून तों तहत मध्यःकालापर्यंतचीं सर्व संस्कृत प्राकृत भाषांचीं स्वरूपें ते पहात चालले व शब्दांची कुळकथा, इतिहास ते जमवीत चालले. प्राचीन शब्द साधनांची फोड करून त्यांतील अनेक सुप्त ज्ञान संग्रह ते बाहेर काढीत होते. शेंकडों हजारों शब्दांच्या व्युत्पत्त्या ते बसवीत चालले व हें शब्दांतील इतिहास बाहेर काढ-ण्याचें काम त्यांस मनापासून आवडूं लागलें. या कामांत त्यांस जुन्या ज्ञानेश्वरीचें फार महत्त्व वाटे. ज्ञानेश्वरीत अनेक रुपें—शब्दांची परंपरा कशीं आलेलीं आहेत, क्रियापदांची संपत्ति व शब्दसंपत्ति ज्ञानेश्वरींत कशी विपुल आहे हें दाखविण्यास त्यांना आवेश चढे. सांगूं लागले म्हणजे भराभरा ज्ञानेश्वरींतील ओव्या व शब्द त्यांच्या जिव्हाग्रीं नाचूं लागत. व्युत्पत्तिशास्त्र त्यांच्या हातचा मळ होऊन बसलें. हजारों हजार शब्दांच्या व्युत्पत्त्या त्यांनीं निरानिराळ्या भा. इ. सं. मंडळाच्या इतिवृत्तांतून व अन्यत्र प्रसिद्ध केल्या आहेत. हें सर्व एकत्र छापणें अगत्याचें आहे. मग त्या सर्व व्युत्पत्यांचा परामर्ष घेणारा कोणी प्रतिमल्ल निर्माण कधीं होईल तो होवो.

या भाषाशास्त्र विषयासंबंधीं त्यांचे जे अनेक निबंधप्रबंध

आहेत, त्यांत " विचार व विकार प्रदर्शनाच्या साधनाची इतिहास-पूर्व व इतिहासोत्तर उत्क्रांति हा निबंध केवळ लोकोत्तर आहे. मानव वाणीचा विकास कसकसा होत गेला, व तिची उत्क्रांति कशा क्रमानें व कोणत्या स्वरुपांत झाली हें गहन भाषा तत्वज्ञान त्यांनीं येथें दाखविलें आहे. या अति गहन विषयाचे पापुद्रे आपल्या कुशल व कुशाग्र बुद्धीच्या योगें त्यांनीं सोडवून दाखविले आहेत. हा निबंध मला वाचावयास मिळाला नाहीं. त्याच्यासंबंधीं जें इतरांनीं लिहिलें तें मी वर दिलें आहे.

भाषाशास्त्रविषयक या गोष्टी सांगण्याचे वेळींच मानभावी किंवा महानुभावी पंथाच्या गुप्तभाषेचा जो उलगडा त्यांनीं केला त्याचाही उल्लेख अवश्यमेव केला पाहिजे. राजवाडे यांची बुद्धि संशोधनांत सुख मानणारी होती. निरनिराळ्या ठिकाणचे शिलालेख, ताम्रपट यांतील उलगडे त्यांनी केले आहेत व त्यांनीं ज्ञानांत भर घातली आहे. परंतु ही महानुभावपंथाची गुप्त भाषा उलगडून त्यांनीं मोठीच कामगिरी केली. महानुभावीपंथाचें वाङ्मय ज्ञानेश्वरांच्याही पूर्वीपासूनचें आहे. परंतु हे सर्व ग्रंथ गुप्त संकेथांत लिहिलेले असत. ' क ' बद्दल दुसरेंच एक अक्षर लिहावयाचें; आंकड्यांचेंहि असेंच. यामुळें यांचे ग्रंथ सर्व साधारण मराठी भाषज्ञांस अज्ञात राहिले. प्रख्यात कादंबरीकार हरि नारायण आपटे यांच्या आनंदाश्रम छापखान्यांत महानुभावी पंथाचा ' लीलासंवाद ' म्हणून एक ग्रंथ होता. त्याचा कांहीं एक अर्थ या गुप्त सांकेतिक भाषेमुळें लागत नसे. म्हणून तो ग्रंथ शास्त्री पंडितांनीं तसाच बाजूस ठेवून दिला होता. शेवटीं तो ग्रंथ हरिभाऊंनीं राजवाडे यांच्या

स्वाधीन केला. हा ग्रंथ ज्या संकेतांनीं लिहिला, तो संकेत १२ दिवस सतत एकाग्रतेनें खटपट करून राजवाडे यांनीं उलगडून दाखविला व सर्व परिभाषा बसविली. कोणत्या अक्षराबद्दल कोणतें अक्षर हें सर्व नीट स्पष्ट केलें. महानुभावी महंत या वार्तेनें चकित झाले. डॉ. भांडारकर यांनीं राजवाडे यांचें फार कौतुक केलें. महानुभावीपंथाची अशी किल्ली सांपडल्यामुळें तें वाङमय आतां मराठींत येण्यास मोकळीक झाली. हें वाङ्मय श्रीमंत आहे. अनेक गद्यपद्य ग्रंथ, कोश, व्याकरणें वगैरे यांत आहेत. ही ग्रंथ-संपत्ति जवळ जवळ ६ हजार आहे. ‘ मराठी भाषेतील एक अज्ञान दालन ’ हा कै. भावे महाराष्ट्रसारस्वतकार यांचा निबंध व महानुभावी वाङ्मयांचा इतिहास हें वऱ्हाडांतील देशपांडे यांचें पुस्तक हीं दोन वाचलीं म्हणजे मराठीस या महानुभावी वाङमयामुळें केवढा लाभ झाला आहे याची कल्पना येईल.

राजवाडे यांनीं किती तरी काव्यें, किती तरी बायकांच्या वगैरे प्रचारांत म्हणण्यांत येणारीं गाणीं प्रसिद्ध केलीं, व त्यांतूनसामा - जिक इतिहासाचा जो कण सांपडला तो पुढें ठेविला. भारत इ. सं. मंडाळाचीं इतिवृत्तें चाळीत बसलें म्हणजे हीं मौजेचीं गाणीं व इतर गोष्टी वाचून मनास करमणूक होते व ज्ञानही मिळतें. बारीकसारीक गोष्टीकडेहि त्यांचें लक्ष असे. दासोपंताचें काव्य जेव्हां छापून निघूं लागलें, तेव्हां जुन्या पोथ्यांत अनुनासिक पोंकळ टिंबानें व अनुस्वार भरींव टिंबानें दाखवीत ही गोष्ट त्यांनींच दिग्दर्शित केली.

एकंदरींत राजवाडे महान् वैय्याकरणी, प्रचंड शब्द संग्राहक होते. या कामास त्यांच्या सारखा प्रतिभावान प्रज्ञावंत व

अनंतश्रमांचा पुरुष पुनरपि केव्हां लाभेल कोणास माहीत ? भाषा विषयक त्यांच्या या कामगिरीस तोड नाहीं.

---

प्रकरण ४ थें



# समाजशास्त्रविषयक व इतर निबंध.



इतिहास—शास्त्रविवेचक व इतिहास संशोधक, महान् व्याकरणशास्त्रज्ञ आणि शब्दसंग्राहक, त्याप्रमाणेंच राजवाडे हे समाजशास्त्रज्ञपण होते. महाराष्ट्रांत समाजशास्त्राचा अभ्यास करणारे जवळ जवळ फारसे कोणी पंडित झाले नाहींत. राजवाडे यांच्या पूर्वीं या शास्त्रास महाराष्ट्रांत प्रथम हात घालणारा विद्वान पुरुष म्हणजे राजाराम शास्त्री हे होत. हे स्पष्टवक्ते अतएव विक्षिप्त म्हणून गाजले. स्वतंत्र विचाराचे व स्वतंत्र प्रतिभेचे असे हे पुरुष होते. राजारामशास्त्र्यांनींच काम राजवाडे यांनीं पुढें चालविलें.

समाजशास्त्र हें मानवशास्त्रांत अंतर्भूत होणाऱ्या अनेक शास्त्रापैकीं एक शास्त्र आहे. भाषाशास्त्र, प्राणेशास्त्र, शारीशास्त्र, समाजशास्त्र वगैरे गोष्टींचा अंतर्भाव मानवशास्त्रांत होतो. अशा या अनेक शास्त्रांत वाहिलेले लोक आपणांकडे नाहींत. राजवाडे यांनीं या शास्त्राचा अभ्यास केला होता; व भाषाशास्त्र आणि मास्तिष्क-

शास्त्र यांच्या साहाय्यानें ते यांत सिद्धांत मांडूं पाहात असत. ‘ हिंदुसमाजांत हिंद्वितरांचा प्रवेश, भारतीय विवाहपद्धति, चातुर्वर्ण्य, चित्पावनांचा इतिहास, वगैरे त्यांचे लेख समाजशास्त्रविषयक विवेचनानें भरलेले आहेत. चातुर्वर्ण्याच्या उत्कर्षाउपकर्षासंबंधीचें त्यांचें विवेचन मार्मिक व अभ्यासनीय आहे. असिरिया व असुर लोक यासंबंधीं पण अलिकडे ते जास्त विवेचन करण्याच्या विचारांत होते. ग्राम नांवाचा अभ्यास करून त्यावरून महाराष्ट्रीय वसाहत कालाची निश्चिति करावयाची असें त्यांचें मनांत होतें. त्याप्रमाणेंच सर्व आडनांवांचीं यादी करून त्यांच्या विभागणीनें महाराष्ट्राच्या वसाहतीच्या स्वरूपावर कांहीं प्रकाश पडतो कीं काय हें त्यास पहावयाचें होतें यासाठीं ते प्रयत्न करूं लागले होते व निरनिराळ्या क्षेत्रीं जाऊन तेथील बडवे, पंडये यांच्या वह्या तपासण्याचा त्यांनीं उपक्रम सुरूं केला होता. मध्यें मध्यें त्यांस हें तर वेडच लागलें होतें. अमळनेरची त्यांची गोष्ट सांगतात कीं बाहेर ओट्यावर बसून येणाऱ्या जाणाऱ्यास आडनांव, गोत्र वगैरे विचारून ते टिपून घेत. या मिळालेल्या माहितीवरून त्यांनीं महाराष्ट्र वसाहतीचा इतिहासकाल हा निबंध प्रसिद्ध केला आहे; व त्यापेक्षां व्यापक ग्रंथ लिहिण्याचा त्यांचा उद्देश होता

समाजशास्त्राचा अभ्यास करितांना अनेक गोष्टी जनमनास न आवडणाऱ्या लिहाव्या लागतात. प्राचीन विवाहपद्धति हा चित्रमय जगत्मध्यें प्रसिद्ध झालेला त्यांचा लेख पाहून पुष्कळ जुन्या लोकांस वाईट वाटलें. प्राचीन संस्कृतीचा अभ्यास करून भाऊ बहिणीजवळ विवाह करीत असलींच तत्त्वरत्नें बाहेर काढावयाचीं अस-

तील तर तो अभ्यास न करणें बरें असे उद्गार मी पुष्कळांच्या तोंडून त्यावेळीं ऐकिले होते. महाराष्ट्रीय समाजांत नाग समाजाचें बरेंच मिश्रण आहे वगैरेही त्यांचीं मतें असेंच वरवर पाहाणाऱ्यास कशीशींच वाटतात; आणि समाजशास्त्र मानवशास्त्र इत्यादिकांचा कांहीं अभ्यास न केलेले बेजबाबदार लोकही बारीक सारीक लेखांत राजवाडे यांच्या मतावर हल्ले करितात. राजवाडे यांचे सिद्धांत चुकले असतील; पाली हा शब्द ' प्रकट ' पासून आला असावा हा त्यांचा सिद्धांत किंवा नागसंस्कृति महाराष्ट्रांत आली वगैरे सिद्धांत चुकीचेही ठरतील. परंतु अभ्यासु लोकांनीं त्यांच्यावर टीका लिहिली तर शोभेल तरी. वाटेल त्यानें एकाद्या मताच्या अभिनिवेशानें त्यांच्यावर तुटून पडणें हें चांगलें नाहीं. राधामाधव, विलासचंपु, महिकावतीच्या बखरीची प्रस्तावना वगैरे मध्येंही त्यांनी समाजविषयक निरनिराळ्या अंगांचीं चर्चा थोडीबहुत केली आहे.

राजवाडे यांचे इतर विविध विषयांवरही फार सुंदर निबंध आहेत. वाङ्मय विषयक, तात्विक विवेचनात्मक, टीकाप्रतिटीकात्मक राजकारण विषयक व इतर असे त्यांचे पांच भाग पाडावे. वाङ्मय विषयक निबंधांत कादंबरी वगैरे साहित्य संमेलन, पुण्यांतील शारदोपासक मंडळाच्या अध्यक्षपदावरुन केलेलें संभाषण हे महत्त्वाचे निबंध आहेत. कादंबरी या निबंधांत त्यांनीं कादंबरीचा आजपर्यंतचा इतिहास सांगितला. जगांतील उत्कृष्ट कादंबरीकारांच्या ग्रंथांचे उल्लेख करून, त्यांचे मोजमाप करून, ते महाराष्ट्रांतील कादंबरीकाराकडे वळले आहेत. हरिभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्यांचा त्यांनीं गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. व शेवटीं कादंबरीग्रंथ

निर्माण व्हावयास कोणत्या साहित्याची आवश्यकता आहे हें त्यांनीं सांगितलें आहे. ते लिहितात, " आतां ह्युगो, झोला, टाल्स्टाय ह्यांच्यासारखी ग्रंथरचना व्हावी अशी इच्छा असेल, तर त्याला एकच उपाय आहे. ह्यांच्यासारखीं मनें ह्या देशांतील कादंबरकारांची बनलीं पाहिजेत. विधवांची दुःखें पाहून जीव तिळतिळ तुटला पाहिजे. गरीबांची उपासमार पाहून स्वतःच्या घशाखालीं घास उतरतां कामा नये. स्वदेशाचें दैन्य पाहून रात्रींची झोंप डोळ्यांवरून उडून जावी. स्त्रियांची बेअब्रू झालेली पाहून द्रौपदीच्या भीमाप्रमाणें त्वेष यावा. ही मनोवृत्ती ज्यांची झाली, त्या ब्रह्मानंदीं ज्यांची टाळी लागली, त्यांनींच कप्तान ड्रेफूसची बाजू घेऊन सर्व राष्ट्रा–विरुद्ध भांडावें व रशियांतील पातशाहांनाही चळचळ कापायला लावावें. इतरांची माय हीं कामें करणाऱ्या कादंबरीकारांना व्याली नाहीं ! तेव्हां उत्तमोत्तम कादंबरीकार व्हावयाचें म्हणजे मनोवृत्ति अशी अत्यंत जाज्वल्य पाहिजे. श्रेष्ठ विद्या, विस्तृत वाचन, मोठा प्रवास, तीक्ष्ण निरीक्षण, कडक परीक्षण, थोर औदार्य, गाढ सहानुभूति, व नाटकी लेखणी हे गुण तर नांव घेण्यासारख्या कादंबरीकारांत हवेतच. परंतु सर्वांत मुख्य गुण म्हटला म्हणजे जाज्वल्य मनोवृत्ति हवी. तिच्या अभावीं वरील सर्वगुण व्यर्थ होत. ही मनोवृत्ति कृत्रिम तऱ्हेनें येत नाहीं. ही ईश्वराची देणगी आहे. उत्तेजक मंडळ्यांच्या बक्षिसांनीं किंवा प्रोत्साहक सोसायट्यांच्या देणग्यांनीं रद्दड कविता, रद्दड कादंबऱ्या, रद्दड नाटकें, रद्दड चरित्रें, अशी सर्व रद्दड ग्रंथप्रजा उत्पन्न होईल. तेजस्वी ग्रंथसंपत्ति निर्माण व्हावयाला जाज्वल्य अशा प्रखर मनोवृत्तीचा–जातीचा अंकुर पाहिजे

अशी उद्बोधक शब्दांनीं या विस्तृत निबंधाचा शेवट केला आहे.

कादंबरी हा निबंध जर वाङ्मय संबंधीच्या लेखांत उत्कृष्ट आहे, तर तात्विक विवेचनात्मक लेखांत 'रामदास' हा लेख अत्यंत महत्वाचा आहे. 'रामदास' या निबंधानें महाराष्ट्रांत रामदासासंबधींच्या विचारांत क्रांति घडून आली. समर्थ व इतर संत यांतील फरक दाखवून राजकारण व धर्म यांचे परस्पर संबंध कशा स्वरूपाचे पाहिजेत हें समर्थांच्या ग्रंथांतील उताऱ्यांनीं सिद्ध करून, पाश्चात्य राजकारण विषयक तत्वज्ञानापेक्षां समर्थांची दृष्टी किती खोल होती हें राजवाडे यांनीं दाखवून दिलें आहे. 'रामदास' या निबंधानें समर्थांचे विचारसामर्थ्य महाराष्ट्रांस कळूं लागलें. देवप्रभृति धुळें येथील लोकांस समर्थकालीन वाङ्मय संशोधण्यास स्फूर्ति आली व सत्कार्योत्तेजक मंडळ स्थापन झालें. राजवाडे यांची बुद्धि किती खोल असते तें या निबंधांत उत्कृष्टपणें दिसून येतें.

टीकाप्रतिटीकात्मक लेखांत 'किंकेडच्या ग्रंथावरील लेख' केसरींतील बाजीराव व मद्यपान यासंबंधीं वाद, ज्ञानेश्वरीवाद, वगैरे लेख आहेत. राजकारण विषयक लेखांत सुरतेची राष्ट्रीय सभा, गोखल्यांची इंग्लंडांतील कामगिरी, स्वदेशी, वेदोक्त, बडोदें राज्यांतील सुधारणा, ६ संबंधद्वालन मीमांसा ७ महाराष्ट्रांतील गेल्या ७५ वर्षांतील कर्त्यापुरुषांची मोजदाद—हे लेख महत्वाचे आहेत; हा शेवटचा निबंध फार महत्वाचा आहे. त्यावरून आपल्या समाजाची नीट कल्पना येते. याच निबंधांत तात्या टोपी, नानासाहेब बंडवाले यांस पहिल्या दर्जाचे देशभक्त असें राजवाड्यांनीं गौरविलें आहे. लोकशिक्षण या मासिकांत हा लेख प्रसिद्ध झाला

होता. ' गोखल्यांची इंग्लंडांतील कामगिरी, हा लेख विश्ववृत्त यांत प्रसिद्ध झाला व तोही मला फार आवडला. राष्ट्रीय पुढाऱ्यास सर्व जनतेचा पाठिंबा असल्याशिवाय त्याच्या म्हणण्यास जोर येत नाहीं. आपल्या देशांतील लोक पुढाऱ्यास फसविणारे व कृतघ्न कसे आहेत, त्यांच्यांत निष्ठा नसून ते लोंचट कसे आहेत वगैरे मुद्देसूत विवेचन राजवाडे यांनीं त्यांत केले आहे.

इतर संकीर्ण लेखांत अत्यंत प्रामुख्यानें ज्याचा निर्देश केला पाहिजे असा लेख म्हणजे ' कनिष्ठ, मध्यम व उच्च शाळांतील स्वानुभव ' हा त्यांचा आत्मचारित्रपर लेख होय.

राजवाडे यांची मनोरचना कशी तयार झाली, त्यांच्या मनावर व बुद्धिवर कोणत्या गोष्टींचे संस्कार झाले, हें समजण्यास हा लेख फार महत्वाचा आहे. तत्कालीन शाळा, कॉलेजें, अध्यापक वर्ग वगैरेंची पण कल्पना आपणांस येते. या संकीर्ण निबंधांत तत्कालीन म्हणजे गेल्या शतकाच्या शेवटच्या २५।३० वर्षांची थोडीफार स्थिती समजून येते. शिवकालीन समाजरचना हा केसरीमधील निबंध असाच सुरेख आहे. इतिहास व ऐतिहासिक यामधील इतिहास संशोधनाचा आढावा घेणारा त्यांचा लेख—त्यांतील दफ्तरें व संशोधनाचे कार्यांतील कष्ट व हाल यांचें विवेचन वाचण्यासारखें आहे.

भारत इतिहाससंशोधक मडळाच्या अहवालांतून बारीक-सारीक गोष्टींवर लहानमोठें शेंकडों निबंध, टांचणें टिपणें त्यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांचे हे लेख ग्रंथमाला, विश्ववृत्त, लोकशिक्षण, सरस्वतीमंदीर, राष्ट्रोदय, इतिहास व ऐतिहासिक, रामदास व

रामदासी, विद्यासेवक, चित्रमयजगत्, प्रभात, प्राचीप्रभा, भारत इति-
हास संशोधक मंडळाचे अहवाल—शिवाय ज्ञानप्रकाश, केसरी,
समर्थ वगैरे वृत्तपत्रें यांतून प्रसिद्ध झालेले आहेत. ग्रंथमालेंतील
त्यांचें कांहीं लेख ' संकीर्ण लेख ' या नावानें स्वतंत्र खंडांत
प्रसिद्ध झाले आहेत.

राजवाड्यांच्या या अवाढव्य लेखन सामुग्रीचा सामग्र्यानें विचार
केला म्हणजे मन चकित होतें व एकच पुरुष श्रमसातत्याच्या
जोरावर श्रद्धापूर्वक व आस्थेनें कार्य करावयास लागला तर कसे
चमत्कार घडवून आणतो हें आपणांस दिसून येतें.

---

## प्रकरण ५ वें.



# राजवाडे यांचें लिहिणें--त्याचें स्वरूप--गुणदोष.

केवळ वाङ्मयवर्णन हा राजवाडे यांच्या लिहिण्याचा हेतु
नाहीं. लेखणीचा विलास दाखविणें हें त्यांचें जीवित ध्येय नव्हतें.
त्यांनीं सर्व लिहिलें तें मराठींत लिहिलें. मराठीचा त्यांस फार अभि-
मान होता. इंग्रजींत एकही ओळ लिहिणार नाहीं ही त्यांची प्रतिज्ञा
होती. मराठी भाषेसंबंधीं ते ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेंत लिहितात
' शिष्ट मराठींत सात आठशें वर्षांपासूनची ग्रंथरचना असून, ती
महाराष्ट्रांतील सर्व प्रांतांतल्या व बडोदें, इंदूर, ग्वाल्हेर, बुंदेलखंड,

तंजावर, गुत्ती, बल्लारी वगैरे संस्थानांतल्या मराठी लोकांना आदरणीय झालेली आहे. ज्या भाषेंत मुकुंदराज, ज्ञानेश्वर, सूर्य ज्योतिषि, एकनाथ, तुकाराम, रामदास, चिपळूणकर वगैरे प्रासादिक ग्रंथकारांनीं ग्रंथरचना केली ती शिष्ट भाषा महाराष्ट्रांतील सर्व प्रांतांतील व जातींतील लोकांस सारखीच मान्य व्हावी यांत आश्चर्य नाहीं. प्रांतिक बोलणें प्रांतापुरतें व जातीक बोलणें जातीपुरतें. परंतु ग्रंथिक बोलणें व लिहिणें सर्व महाराष्ट्रांकरितां आहे. प्रांतिक पोटभाषांच्या लहानसान लकबा आणि जातिक भाषणांतले बालिश अपभ्रंश ग्रंथिक राजभाषेच्या शिष्ट दरबारांत लुप्त होतात व एकच एक निर्भेळ अशी मराठ्यांची मायभाषा देशांतील सर्व लोकांच्या अभिमानाच्या, कौतुकाच्या व सहजप्रेमाचा विषय होते; मराठ्यांना स्वभाषेचा इतका अभिमान जो वाटतो तो फुकाचा नाहीं. मराठी भाषेंतल्या शब्द प्राचुर्याची बरोबरी पृथ्वीवरील कोणत्याही भाषेला करतां यावयाची नाही. तसेंच कोणताही गूढ किंवा सूक्ष्म अर्थ नानातऱ्हांनीं यथेष्ट व्यक्त करण्याची तिची शक्ती अप्रतिम आहे. शिवाय अनेक थोर प्रासादिक ग्रंथकारांनीं तिला आपल्या उदात्त, गंभीर, ललित व रम्य विचारांचें निवेदन केलें असल्यामुळें तिच्यावरील महाराष्ट्रीयांची भक्ति शुक्लेंदुवत् उत्तरोत्तर वर्धमान स्थितींत आहे. ”

मराठीचा हा राजवाडे यांचा अभिमान दासोपंतांनीं संस्कृतपेक्षां मराठी कशी श्रेष्ठ आहे हें दाखविलें त्याप्रमाणेंच जाज्वल्य आहे. मराठी संबंधीं अशी अलौकिक भक्ति असली तरी मराठींतील नामांकित ग्रंथकार या नात्यानें त्यांस प्रसिद्ध व्हावयाचें नव्हतें.

राजवाडे हे वाङ्मयसेवक, महान् सारस्वत सेवक असले तरी धर्म-दर्शनीं ते सिद्धांत संस्थापक आहेत. समर्थांचें काव्य महत्वाचें नसून त्या काव्यांतील तत्वें महत्वाची आहेत. He is first a philosopher and then a poet. हे जसें रामदासासंबंधीं म्हणतां येईल, त्याप्रमाणेंच राजवाडे यांचे आहे. मुक्तेश्वरादि कवि, किंवा चिपळूणकर हे वाङ्मयाचे सेवक आहेत. वाणीस सजवावें कसें, उपमा दृष्टान्तादि अलंकार ठिकठिकाणीं योजून सर्वांस कसें मोहून टाकावें, हें ते जाणतात. मुक्तेश्वरांची वाग्देवी अनेकालंकारांनीं नटलेली आहे. चिपळूणकर आपल्या वाग्गंगेत आम्हांस स्वैर विहार करावयास लावतात; राजवाडे यांचें तसें नाहीं. येथें गंगाकाठीं विहार करणारे निरनिराळे पक्षी, चक्रवाक, मयूर, कोकिळादिकांचे कलरव, भृंगांचें गुंजगान, पद्मांचे फुलणें, सुगंधाची लयलूट हें कांहीं आढ-णार नाहीं. येथें विलास, लालित्य नाहीं. येथें काय आहे ? राजवाडे यांची भाषा सडेतोड व जोरदार आहे. मृदुत्व तिला खपत नाहीं. येथें कौमुदीचें सुकुमारत्व, सुभगत्व, शीतलत्व हें कांहींएक नसून, सूर्यप्रभेची प्रखरता व प्रज्वलता आहे. जोरकस रीतीनें सिद्धांत कसा मांडावा हेंच ते पहात असत. भाषेकडे त्यांचें लक्ष असे तथापि अर्थाकडे, सिद्धांताकडे जास्त असे. सिद्धांतस्वरूपी त्यांचें लिहि" आहे. येथें गुळमुळितपणा नाहीं. गुरु शिष्याला बजावतो आहे, सेनापति सैन्यास हुकूम करतो आहे असें त्यांचे लेख वाचतांना वाटतें. आपला सिद्धांत बरोबर आहे, आणि आपल्या विचारसरणीचे अधि-कारी पुरुष आपणच आहोंत अशा आत्मविश्वासानें त्यांचे लेख भर-लेले आहेत. बुद्धीचा स्वच्छपणा व भाषेचा जिवंतपणा त्यांच्या

लेखांत स्पष्टपणें पाहावयास मिळतो. लेचेपेचें व गबाळ लिहिणें त्यांचें नसावयाचें. खंबीर, अर्थगंभीर असें त्यांचें लिहिणें आहे. विचारांच्या प्रखर जोरामुळें, भावनांच्या उद्रेकामुळें त्यांत समयोचित भाषा आपोआप स्फुरत असे. अर्थानुरूप त्यांची भाषा आहे. 'वाचमर्थोनुधावति' अशा ऋषिकोटींतील हा लेखक आहे असें दिसून येतें. सागराचें गांभीर्य व गगनाचें गौरव आपणांस त्यांच्या लेखांत प्रतीत होतें. भाषेंतच ते गुंगत राहात नाहींत. भाषा हें गहन अर्थ स्पष्ट करावयाचें एक साधन असें ते समजत—म्हणून भाषा सजवणीला त्यांनीं अवकाश दिला नाहीं. ते वाङ्मय राष्ट्रांतील संन्यासी आहेत. संन्याशास ज्याप्रमाणें विलास सुचत नाहींत त्याप्रमाणें भाषेचे विलास राजवाडे यांस सुचत नसत. त्यांच्या लिहिण्यांतील प्रत्येक शब्द महत्त्वाचा आहे, प्रत्येक शब्द मोलाचा आहे. त्यांची लेखणी तीक्ष्ण होती. तिच्यांत स्पष्टपणा व कडवेपणा असे. त्यामुळें ती पुष्कळांस झोंबे. त्यांचे सडेतोड सिद्धांत वाचून दुसरा थक्क होई. राजवाडे यांच्या सिद्धांतावर टीकाही त्यामुळें पुष्कळ झाल्या राजवाड्यांच्या गागाभट्टीवरील ठाकरे यांची कोदंडाचा टणत्कार ही टीका नमुन्यादाखल म्हणून नमूद करतों. त्यांचे इतरही सिद्धांत व मतें यांच्यावर पुष्कळांनीं टीका केल्या आहेत. राजवाडे हे दुसऱ्यावर कसून टीका करीत व दुसऱ्या पासूनही ते मुळमुळीत टीकेची अपेक्षा करीत नसत. या बाबतींत राजवाडे व टिळक यांचें साम्य आहे. प्रतिपक्षी यांची रेवडी कशी उडवावी हें उभयतांस फार चांगलें साधे.

राजवाडे यांची भाषा संस्कृत शब्दप्रचुर आहे; तरीपण ती

जातिवंत व शुद्ध मराठी वळणाची वाटते. त्यांचें लिहिणें फार परिणामकारक असे. त्यांच्या प्रस्तावना वाचावयास वाचकांच्या कशा उड्या पडत हें पुष्कळांस माहीतच असेल. त्यांची भाषा दुसऱ्यांस अनुकरण करण्यास येत नसे. त्यांच्या प्रत्येक शब्दावर त्यांचा ठसा आहे. राजवाडे यांची भाषा ताबडतोब समजून येते. एखादें वाक्य, एखादा उतारा वाचला म्हणजे हा राजवाडी असला पाहिजे असें ताबडतोब सांगता येते. इंग्रजीमध्यें कार्लाईलची भाषाशैली जशी अगदीं निराळी व स्पष्टपणें उमटून पडणारी दिसते, तसेंच राजवाडी भाषेचें आहे. थोडक्यांत बव्हर्थ आणण्याची राजवाडी हातोटी क्वचितच इतरांस साधते. त्यांच्या लिहिण्यांत निरर्थक व उगीच विस्तार आढळणार नाहीं. त्यांच्या लेखांत त्यांच्या प्रतिभेचें व त्यांच्या बुद्धीचें स्वच्छ प्रतिबिंब पडलें आहे. Style is the man-भाषाशैली म्हणजे ग्रंथकाराचें पूर्ण स्वरूपच — असें जें म्हणतात तें राजवाडे यांच्या बाबतींत खरें आहे. त्यांच्या स्वभावाचे गुण दोष त्यांच्या लिखाणांत आहेत. निर्भीडता, कळकळ, स्वतंत्रप्रज्ञा जोरदारपणा, विलास व नटवेगिरीचा तिटकारा—या त्यांच्या स्वभावाचें आविष्करण त्यांच्या सर्व लेखनसाहित्यांत झालें आहे.

राजवाडे यांच्या लेखणीसारखी तीक्ष्ण, कार्यकर्ती, प्रभावशाली लेखणी महाराष्ट्रांत कोणी धरिली नाहीं. त्यांच्या लेखणींतील तल्लखपणा, सडेतोडपणा ही त्यांच्या सिद्धांताच्या सत्यत्वापासून उत्पन्न झालेली असत; आत्मविश्वासाचा तो परिणाम होता.

---

## प्रकरण ६ वें



# राजवाड्यांची विशिष्ट मनोवृत्ति.



तीन तपें निरलसपणें राजवाडे यांनीं निरानिराळ्याप्रकारें राष्ट्राची सेवा केली. प्रदीप्त प्रतिभा, अवर्णणीय निःस्पृहता, अत्युदात्त निरपेक्षता, अतुल कष्टशीलता इत्यादि सद्गुणांच्या साहाय्यानें आपल्या राष्ट्राची सेवा केली. कोणत्या हेतूनें राजवाडे या सेवेस प्रवृत्त झाले ? राष्ट्राचा अधःपात झालेला आहे. हा कां झाला, असे अधःपात कां होतात, कसे होतात—याची कारणमीमांसा करण्याच्या उद्देशानें ते आपल्या जीवित कार्यास लागले. आपल्या महाराष्ट्रास निकृष्ट स्थिति हीनदीन स्थिति कां आली हें नीट सम्यग् रीतीनें, समजून घेतल्याशिवाय, राष्ट्राच्या उद्धारार्थ योग्य दिशेनें प्रयत्न करणें शक्य होणार नाहीं हें त्यांच्या बुद्धीनें जाणलें. आपलें चुकतें आहे कोठें हें समजल्याशिवाय, आपणांस चुका सुधारतां येणार नाहीं. यासाठीं ते आपला इतिहास यथार्थ स्वरूपानें पाहूं लागले. परकीय इतिहासकार आपल्या देशाचा इतिहास जिव्हाळ्यानें कसा लिहिणार? इंग्लिश लोक नेपोलियन यास अधम म्हणतात, तर फ्रेंच लोक वेलिंग्टन यास तुच्छ लेखतात. तेव्हां हे परके लोक आपल्या भारताचा इतिहास असात्र विकृत स्वरूपांत लिहिणार यांत शंका नाहीं.

म्हणून प्रथम हा राष्ट्रीय स्मृति तयार करण्यासाठीं राजवाडे तयार झाले. परंतु राजवाडे यांची दृष्टि एकांगी नव्हती. अनेक तऱ्हांनी व अनेक दिशांनीं आपणांस खटाटोप करावे लागणार हें त्यांस स्पष्ट दिसून येत होतें. परकी लोकांशीं टक्कर द्यावयाची म्हणजे आपण त्यांच्या तोलाचे झाल्याशिवाय कांहींएक हातून होणार नाहीं असें ते म्हणत. प्रत्येक शास्त्रांत पाश्चात्य लोक पुढें पुढें जात आहेत व आपणांत शास्त्राभ्यास व शास्त्रसंवर्धन करणारा कोणीच पुढें येत नाहीं याचें त्यांस आश्चर्य वाटे. समाजशास्त्र, भाषाशास्त्र, इतिहासशास्त्र, रसायनशास्त्र अशा प्रकारच्या सर्व शास्त्रांच्या अध्ययनांत गति करून घेतल्याविना आपला तरणोपाय नाहीं असें ते म्हणत. हीं कामें एकेकट्यानें होणार नाहींत. म्हणून त्यांनीं संघटना करण्याचेही प्रयत्न केले. त्यांनीं अनेक मंडळें स्थापन केलीं. पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळाच्या नमुन्यावर धुळें, अंमळनेर वगैरे ठिकाणी त्यांनीं संस्था स्थापल्या. पुण्यास आरोग्यमंडळ ही सभा त्यांनीं स्थापन केली. लोकांचें आरोग्य वाढल्याविना ते सशक्त व कार्यकर होणार कसे ? सावकारांच्या तावडींतून कुळास सोडविणारें—हलक्या दरानें कर्ज देणारें मंडळ त्यांनीं काढलें होतें. रेल्वेसंबंधीं उतारूंच्या तक्रारी दूर करणारें मंडळ त्यांनीं काढलें होतें समाजशास्त्र मंडळ हें समाजाच्या सर्व अंगांचा विकासैक दृष्टीनें अभ्यास करण्यासाठीं त्यांनीं काढलें होतें. शिक्षाविचारमंडळ हें शिक्षणाच्या सर्व प्रकारच्या चर्चा करण्यासाठीं त्यांनीं काढलें होतें. भौतिकशास्त्र संशोधन मंडळ, हें त्यांनीं काढलें व स्वतः त्यास १०० रुपये दिले. ज्ञानेश्वरी मंडळ ज्ञानेश्वरीसंबंधीं चर्चे

करण्यास होतें. अशा प्रकारें निरनिराळ्या कामांत लोकांनीं भाग घ्यावा म्हणून त्यांनीं अनेक मंडळें स्थापिलीं. परंतु या मंडळा-पैकीं किती कार्यकर्तीं झालीं? किती मंडळांवर राजवाडे यांचा संबंध राहिला? या अनेक मंडळांपैकीं पुण्याचें भारत—इतिहास—संशो-धकमंडळ, आरोग्य मंडळ व शिक्षा विचार मंडळ हीं तीन मंडळेंच जिवंत आहेत. भा. इ. संशोधक मंडळ आतां मरणार नाहीं. त्यास प्रो. पोतदार यांसारखे उत्साही कार्यकर्ते लाभले आहेत. शिक्षा विचार मंडळाच्या पुण्यास मधून मधून सभा होत असतात; तसेंच आरोग्यमंडळ वझे व नंतर नुकतेच कैलासवासी झालेले भट यांनीं नांवारूपास आणिलें होतें. बाकींचीं मंडळें राजवाडे ह्यांच्या हयातींत-च आटोपलीं व जीं शिल्लक आहेत त्यां मंडळांजवळही त्यांचा संबंध उरला नव्हता. मंडळें स्थापन करणें हें एक काम व मंडळें चाल-विणें हें दुसरें काम. राजवाडे यांच्याजवळ तडजोड नसे. त्यांना अंगमोड व पदरमोड करणारीं माणसें आवडत. कार्यार्थ ज्यांस तळमळ लागली आहे असे लोक त्यांस पाहिजेत. कार्य करण्याची त्यांची तडफ, त्यांचा उरक इतरांस नसे. इतरांच्या फावल्या वेळांत देशकार्य करण्याच्या प्रवृत्तीचा त्यांस संताप येई. व मग आपणच एकटे दुसऱ्यांवर न विसंबतां आपल्याच सान्निपातिक तडफेनें व जोरानें काम करूं लागत. रें रें करीत काम करणें हें त्यांस सहन होत नसे. त्यांना डॉ. जॉन्सन याप्रमाणें जगाचें, जगांतील लोकांच्या मनोवृत्तींचें ज्ञान नीट झालें नाहीं. डॉ. जॉन्सन लोकांवर प्रथम असाच संतापे. परंतु तो पुढें कमी संतापूं लागला; कारण तो म्हणतो. “ जगापासून मी अपेक्षाच थोडी करितों—त्या

मुळें आतां जग मला चांगलें दिसूं लागलें आहे " जॉन्सनला मनुष्य स्वभाव कळला. हा जात्याच आळशी सुखलोलुप आहे. राजवाडे यांस हा लोकांचा स्वभाव कळला असेल: परंतु तो कळून जॉन्सन प्रमाणें ते संतुष्ट न होतां उलट जळफळत. लोकांचा त्यांस तिरस्कार वाटे. गुलामगिरीमध्येंच गौरव मानूं पाहणारे आपले भाई-बंद पाहिले म्हणजे त्यांच्या स्वाभिमानी मनाचा भडका होई. यामुळें हीं सर्व मंडळें स्थापूनही कार्य करावयास लोक तयार नाहींत हें पाहून ते पुनरपि एकाकीच काम करूं लागले.

मंडळें जमवूनच सर्व काम होईल असें त्यांस वाटत नव्हतें. मंडळें निर्माण करून कांहीं मंडळी कार्यार्थ तयार करणें म्हणजे निम्में काम झालें असें ते म्हणत. ते लिहितात " संशोधनार्थ विद्वान निर्माण करणें आणि त्यांचीं व सहानुभाविकांचीं मंडळें स्थापण्याचें कार्य थोडें फार झालें आहे. परंतु एवढ्यानें संपत नाहीं. देशांत संशोधक मंडळें व संशोधक यांची संख्या वाढली म्हणजे पन्नास हिस्से फत्ते झाली. बाकी राहिलेली पन्नास हिस्से फत्ते एका बाबीवर अवलंबून आहे. ती बाब म्हणजे द्रव्यबल. द्रव्यबलासाठीं देशांत मायेचें व जिव्हाळ्याचें Home-rule स्वराज्य होण्याची आवश्यकता नितांत भासमान होते. " स्वतंत्र देशांत निरनिराळ्या संशोधकांस व संशोधक मंडळास केवढा सरकारी पाठिंबा असतो हें पाहून राजवाडे यांचा जीव तुटे. आपल्या देशांतील सरकार तर बोलून चालून परकी. विद्येच्या अभिवृध्यर्थ, शास्त्र प्रसारार्थ तें जनतेस कसें साहाय्य करणार ? परंतु सरकारनें कानावर हात ठेविले यां आपल्यांच देशांतील लोकांनीं या शास्त्रसंवर्धनाच्या कार्यास

हातभार नको का लावावयास ? राजवाडे संतापून लिहितात- " विद्या वृद्ध्यर्थ द्रव्य कां, कसें व कोठें खर्चावें हें समजण्याची अक्कल अद्याप लोकांना, राजांना, परिषदांना व सभांना फुटावयाची आहे. कबुतरें, वारवनिता, पेहेलवान, तमाशेवाले यांची पारख धनिकांना होऊं शकते. विद्वान्, संशोधक व विचारद्रष्टे यांना ओळखण्याचीं इंद्रियें अद्याप राजांना व परिषदांना आलेली नाहींत. तीं आलीं म्हणजे वागीश्वरांची ओळख धनेश्वरांना पटून शास्त्रें, कला, ज्ञानप्रसार व विदग्ध वाङ्मय यांनीं भूमि फुलून जाईल. " आपल्याकडील धनिक वर्ग देशकार्यास व शास्त्रकार्यास मदत करीत नाहींत याचें त्यांस आश्चर्य वाटे. लोक नाटकें, तमाशे व सिनेमा यांस पैसे खर्चतात, परंतु या देशकार्याशीच त्यांस उदासिनता कां येते ? राजवाडे म्हणतात ' दुष्काळानें व महर्गतेनें पोटभर अन्न न मिळालें तरी चालेल; परंतु भांडी विकून व बायको गहाण ठेवून नाटकें पाहाणारे कारागीर ज्या देशांत फार झाले तो देश पक्का वेडा बनला असला पाहिजे. यांत बिलकूल संशय नाहीं. दहा वर्षांच्या खटपटीनें पैसा फंडानें महाराष्ट्रांत आठ हजार मिनतवारीनें जमतात; एकट्या मुंबईतील सर्व नाटक कंपन्यांचें आठवड्याचें उत्पन्न वीस हजारावर आहे ! ( विश्ववृत्त सप्टेंबर १९०७ ) ' राजवाडे यांना लोकांच्या या कर्तव्याच्या विस्मृतीची चीड येई. त्यांचा स्वतःचा जीव भारतवर्ष प्राचीन वैभवानें पुनरपि विलसूं लागेल त्याच्यासाठीं तळमळत होता. इंग्रज सरकारास घालवून देऊन देश देहानें, मनानें, बुद्धीनें स्वतंत्र कसा होईल याचीच तळमळ त्यांस लागून राहिली होती.

पुनः कर्मनिष्ठ बनण्याचा संभव राहावा. संतांनीं वर्णाश्रमधर्मलोप-प्रधान अशी ही महाराष्ट्रांतील दुर्दैवी प्रजा दोन अडीचशें वर्षे आर्य-समाजांत मोठ्या शिताफीनें थोपवून धरिली व आर्यसंस्कृतीचें रक्षण केलें. तेव्हां संतांनीं आपल्या या देशावर उपकार बिनमोल केले यांत काडीचाहि संशय नाहीं. संतानी प्रजेची बुद्धि धर्मांत ठेविली. परंतु ती प्रपंच प्रवण केली नाहीं. पुढें ऐतिहासिक तत्त्वज्ञानाचा म्हणजे प्रपंच व परमार्थ यांच्या एकवाक्यतेचा उदय रामदासांच्या हस्तें झाला. एकनाथ तुकारामादि संतांचें कार्य व रामदासांचें कार्य हें परस्पर सापेक्ष आहे. संतांनीं मुसल्मानी धर्मापासून जनतेचें रक्षण केलें नसतें, स्वधर्मनिष्ठ त्यांस ठेविलें नसतें तर रामदासांनीं तरी ' विद्या, न्याप, वैभव " याचा उपदेश कोणास केला असता ? असो. तर राजवाडे यांनां संताच्या कामगिरीची किंमत कळत होती'. परंतु लोक जेव्हां खरें कार्य विसरून संतांच्या पाठीमागें लपण्याचा मार्ग स्वीकारतात त्याचा त्यांना तिरस्कार वाटे. ही संन्यास प्रवणता. आहे त्यांतच खितपत पडून राहण्याची प्रवृत्ति राजवाडे यांस नाहींशी करावयाची होती—व यासाठींच त्यांनां प्राचीन इतिहासाची स्मृति जागी करावयाची होती. प्राचीन इतिहासाची स्मृति जागी करून पूर्व वैभवाचें यशोगान करून, त्याप्रमाणेंच पूर्वींच्या चुका स्पष्टपणें दाखवून स्वाभिमानपुरस्सर नवीन कार्याचा पाया घालणें हें त्यांचें जीवित कार्य होतें. सर्व जन्मभर देशहितकारक कामगिरी व्हावी म्हणून या थोर पुरुषास काण कळकळ असे. ते आपल्या एका उद्बोधक टिपणांत लिहितात ' आषाढ शुद्ध अष्टमीस या विशांला नवें ४६ वें वर्ष लागलें. ५४ वर्षे राहिलीं. त्यांत सर्व जगताला हितकारक

नाहीमें करावयाच्या जलाशयांतून शेंकडों मोठमोठे पाट फोडून संन्यास प्रवणतेवर सतत सोडून दिले पाहिजेत. ” राजवाड्यांचा सर्वव्यापी अनिरुद्ध खटाटोप लोकांस कार्यप्रवण करण्यासाठीं होता महाराष्ट्रांत जी एक कार्यनिरिच्छता उत्पन्न झालेली आहे तिचा निरास करण्यासाठीं राजवाडे खपले व ती नाहींशी करण्यासाठींच टिळकांनीं गीतारहस्य लिहिलें. साधु संतांच्या उपदेशानें महाराष्ट्र संन्यासप्रवण झाला; स्वाभिमान त्यानें सोडला असें कधीं कधीं राजवाडे म्हणत. तथापि संतांची खरी कामगिरी त्यांच्या डोळ्यांआड नव्हती. “ शिवकालीन समाज रचना ” या निबंधांत राजवाडे लिहितात “ अठरापगड जातींचे ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र स्वधर्मभ्रष्ट झाले असतां ते बहुतेक मुसलमान बनल्यासारखेच झाले इतकेंच कीं, त्यांनी सुंतेची दीक्षा मात्र घेतली नाहीं. तीही त्यांनीं घेतली असती परंतु त्यांच्या आड एक मोठी धोंड आली. ती धोंड महाराष्ट्रांतील साधु व संत हे होत. भांडणें, तंटे, अपेय-पान, अभक्ष्यभक्षण यांचें साम्राज्य सर्वत्र मातलेलें पाहून ही बज-बजपुरी कांहींतरी ताळ्यावर यावी या सद्धेतूनें साधुसंतांनी सर्वांना सहजगम्य व सुलभ असा भक्तिमार्ग सुरू केला. धर्मज्ञान लोपलें होतें; विधिनिषेधाची प्रतिष्ठा राहिली नव्हती; प्रायश्चित्तास कोणी पुसत नव्हतें. अशी सर्व प्रजा वृषलवत् अथवा बहुतेक म्लेंछवत् बनली होती. ही प्रजा सनातन धर्मास व आर्य संस्कृतीस सोडून जावयाच्या पंथाला लागली होती. बरेच सोडून गेलेहि होते. बाकी राहिलेल्या लोकांचा मगदूर पाहून साधुसंतांनीं परम कारुणिक बुद्धीनें भक्तिमार्ग सुरू केला. सद्धेतूनें कीं, कसेंहि करून हे लोक

त्यांची बुद्धि सर्वंकषा असल्यामुळें ती कोणत्याही शास्त्रांत अंकुठित रीतीनें चाले. लोक निजले आहेत, घोरत आहेत असें पाहून तेच निरनिराळ्या शास्त्रांस चालना देत. इतिहास संशोधन, भाषाशास्त्र, समाजशास्त्र, रसायनशास्त्र सर्वत्र त्यांची दृष्टि होती. हेतू हा कीं निरनिराळ्या लोकांपुढें निरनिराळीं कार्यक्षेत्रें मांडावी. त्यांची प्रतिभा दिव्य व ज्ञानचक्षू निर्मळ यामुळें एकाच विषयाचीं निरनिराळीं अंगें आपल्या ओजस्वी निबंधांतून ते लोकास सांगत. सर्व शास्त्रांस त्यांनीं गति दिली; चालना दिली. असा चतरस्त्र महाधी पुरुष महाराष्ट्रांत झाला नाहीं.

त्यांनीं स्वतः प्रचंड काम केलें. परंतु अद्याप किती तरी काम झालें पाहिजे असें ते म्हणत. पूर्ववैभव, प्राचीन पूर्वजांची थोर स्मृति लोकांच्या अंतरंगीं जागृत करून त्यांस कार्यप्रवण करावयाचें होतें. 'आलस्य व किंकर्तव्यमूढता त्यांस घालवून द्यावयाची होती. राजवाडे लिहितात ' तात्विक हवेच्या संन्यासप्रवण व मांद्योत्पादक दाबाखालीं चिरडून गेल्यामुळें प्रपंचाची म्हणजे इतिहासाची हेळसांड करण्याकडे लोकांचा जो आत्मघातकी कल आहे, तो घालविण्यासाठीं इतिहासज्ञानप्रसाराची व तत्साधन प्रसिद्धिची आवश्यकता सध्यां विशेषच आहे असें माझें ठाम मत आहे. काल, देश, कुल या त्रिविध दृष्टिनें भारतवर्षाच्या व महाराष्ट्राच्या नानाविध चरित्राचा अफाट विस्तार पाहतां, आजपर्यंत प्रसिद्ध झालेलीं साधनें जला-शयांतून एखाद्या बेडकानें मोठ्या प्रयासानें आपल्या क्षुद्र ओंजळीत वाहून आणलेल्या बिंदूप्रमाणें आहेत. त्या बिंदूमात्रानें संन्यास प्रवणतेची मलीन पटलें धुवून जाणार कशी ? हें मालिन्य साफ

' हिंदुस्थानांतून इंग्लिशांस घालवून देणें हेंच सुशिक्षित हिंदवासीयांचें आद्य कर्तव्य होय.' असें त्यांनीं स्पष्टपणें एके ठिकाणीं लिहिलें आहे. इंग्रजांस लाथा मारून घालवून देण्याची शक्ति आमच्यांत आल्याशिवाय आमचा तरणोपाय नाहीं असें ते म्हणत.' त्यांचें ध्येय हें अशा प्रकारचें आहे. या ध्येयार्थ त्यांनीं सर्व आयुष्य खर्च केलें. रसायन शास्त्रांसारख्या शास्त्रांचा आपण अभ्यास केल्याविना इंग्रजांस देशाबाहेर घालविण्यास आपण समर्थ होणार नाहीं हें ते तरुणांस पुनः पुन्हा सांगत. रसायनशास्त्र, इतर भौतिकशास्त्रें यांत पारंगत व्हा. सर्व कला आपल्याशा करा, असें ते विद्यार्थ्यांस वारंवार बजावीत. याच कार्यासाठीं त्यांनीं रासायनिक मंडळ हीं पुण्यास काढलें होतें. परंतु लोकांस हौस व उत्कंठा लागली आहे कोठें ? एका प्रचंड प्रयोग शाळेंत अनेक विद्यार्थी निरनिराळे शोध लावीत आहेत व त्यांच्यावर आपण देखरेख करीत आहोंत; जगाच्या ज्ञानांत भर पडत आहेत - अशा सुख-स्वप्नांत त्यांचा आत्मा तरंगत असे. परंतु वस्तुस्थिति कशी होती ? रसायन शास्त्रांतील नैपुण्य मिळविण्याऐवजीं त्यांस जुनीं इतिहासाचीं दप्तरें झाडण्याचें काम करावें लागलें. राजवाडे म्हणत ' मी जर श्रीमंत व लखपति असतों तर मोठा रसायनशास्त्रवेत्ता झालों असतों; परंतु भिकारी असल्यामुळें इतिहास संशोधनाचा व भाषा संशोधनाचा बिनभांडवली धंदा मला पत्करावा लागला.' मरावयाचे आधीं कांहीं दिवस ते सृष्टिशास्त्र, रसायनशास्त्र यांवरील ग्रंथ वाचूं लागले होते व आपण आतां मोठे रसायनशास्त्रवेत्ते होऊं असें ते म्हणत.

तां पार पाडावयाचें आहे. राजकीय, सामाजिक, वाङ्मय वगैरे कोणतेंहि कृत्य ह्या देशांत ज्या कोणाला करण्याची उमेद आली असेल त्यानें अंगिकारिलेल्या कृत्याच्या विस्ताराचा अंदाज घ्यावा, त्यांत व्यंगें व दोष कोठें आहेत त्याची विचक्षणा करावी, व ते दोष, व्यंगें काढण्यास स्वतांच लागावें, इतर कोणाची वाट पाहूं नये. कारण ममतेनें धावून येण्यास कोणीच नाहीं स्वजनहि नाहींत व परजन तर नाहींतच नाहींत. अशी एकंदर फार हलाखीची स्थिति आहे. आणि ही स्थिति कांही उत्साह विघातक नाहीं. 'संकट यावें तर असेंच यावें. ह्या संकटांतच आपल्या कर्तबगारीची खरी परिक्षा आहे. "

राजवाडे यांस सर्व शास्त्रांची कशी जरूर भासे हेंही त्यांनी वरील लेखांतच पुढें लिहिलें आहे. ते लिहितात " व्याकरणशास्त्रावांचून सध्यां काय अडलें आहे, असा बालिश प्रश्न कोणी कोणी करतात. त्यांना उत्तर एवढेंच कीं हरएक शास्त्रांवांचून तर देशाचें सर्वत्र नडत आहे; जितकें रसायनशास्त्रावांचून नडत आहे, जितकें राज्यशास्त्रावांचून नडत आहे, जितकें युद्धशास्त्रावांचून नडत आहे, तितकेंच व्याकरण शास्त्रावांचूनहि नडत आहे " राष्ट्राच्या प्रगतीला व व्यवहाराला सर्व शास्त्रांची जरूरी आहे. हें लक्षांत आणूनच राजवाडे अकुंठित गतीनें वनराजाप्रमाणें सर्व ज्ञानक्षेत्रांत अनिरुद्ध विहार करते झाले. भारतीयांच्या शब्दालाहि मान ज्ञानक्षेत्रांत मिळावा ही त्यांची महत्त्वाकांक्षा होती. भारतीयांचा देह पारतंत्र्यांत असो; पण मानसहंस तरी स्वतंत्र होवो हें त्यांचें दिवारात्रीचें स्वप्न होतें. भारतीयांच्या विचार विहंगमास ज्ञानाच्या गुलामगिरींतून त्यांनीं मुक्त

च मजुरांचें राष्ट्र होणार असा भयसूचक ब्युगल त्यांनीं वाजविला. परंतु अशी निराशा दिसत असूनही ते प्रयत्न अखंड करीत होते. निराशेची आशा त्यांज्या जवळ होती. दामले यांच्या व्याकरणाचें परीक्षण करून ते शेवटीं म्हणतातेंं ' प्रत्येकानें आपापलें काम स्वतःच करावें हें श्रेयस्कर, कां कीं, प्रस्तुत कालीं आपल्या देशांतली परिस्थितीच अशी आहे. कोणतेंही शास्त्रीय काम करण्याला ह्या देशांत प्रायः अनेक तर सोडून द्या पण अर्धाहि माणूस तयार झाला नाहीं. तेव्हा श्रमविभाग होण्याची आशा करणें आणीक पन्नास शंभर वर्षे ह्या देशांत अयुक्त होय. कधीं काळीं चुकून माकून एखाद्याच्या मनांत कांहीं शास्त्रीय कृत्य उठविण्याचें सुदैवानें मनांत आलें व मनांत येऊन त्या कृत्याचा अंत पाहण्याचा उत्साह त्याच्याठायीं वर्षोनवर्ष कायम राहिला तर त्यानें ह्या देशांत इतर कोणाच्याही साहाय्याची अपेक्षा करूं नये, हें उत्तम. कारण साहाय्य होण्यासारखी परिस्थिती नाहीं. एका काळच्या ह्या शास्त्रीय भूमींत मध्यां शास्त्राचा अत्यन्त लोप झालेला आहे. प्रायः ह्या देशांतील यच्चयावत लोकांची स्थिति आफ्रिकेंतील निग्रोंच्या स्थितिच्या जवळ जवळ आलेली आहे. ज्यांना ग्राजुएट म्हणून म्हणतात त्यांच्याजवळही शास्त्र नाहीं व ज्यांना शास्त्री म्हणतात त्यांच्याजवळही शास्त्र नाहीं. एक पाश्चात्य सटर फटर पुस्तकें वाचून घोकून खर्डेघाश्या गुलाम बनलेला आहे व दुसरा पौरस्त्य ग्रंथ घोकून मद्दड झालेला आहे. अशा ह्या दुहेरी कंगाल समाजाला सुधारण्याचें म्हणजे शास्त्रीय स्थितीस नेण्याचें बिकट कृत्य, कोणाचेंहि साहाय्य मिळण्याची आशा व करि-

माणेंच आर्य लोकांच्या विजयाचा एक मोठा ग्रंथ ते लिहिणार होते. या ग्रंथाची त्यांनी खालीप्रमाणें रूपरेखा आंखली होती.

१ क्षेत्रांतील पंड्यांच्या वह्यांवरून अखिल हिंदुस्थानांतील आर्यांचीं आडनांवें संगतवार लिहून काढणें व त्यांचें सामाजिक वर्गीकरण फार काळजीपूर्वक करणें.

२ नंतर हिंदुस्थानांतील बाहेरच्या देशांतील गांवांचीं नांवें पाहून त्या आडनांवांचा व त्या स्थानांचा संबंध ऐतिहासिक व सामाजिक दृष्टीनें निश्चित करणें.

३ शक्य तितक्या अधिक गांवांचें अति प्राचीन नांव शोधून काढून आर्यांच्या हालचालीच्या दृष्टीनें त्यांचें महत्व निश्चित करणें.

४ या व अशा अनेक महत्वाच्या मुद्यांचें संगतिकरण करून आर्यांच्या एकंदर क्रांतीचें व विजयाचें स्वरूप दाखविणें. अशा प्रकारच्या अलौकिक ग्रंथाला त्यांनीं आरंभ केला होता हें मागें सांगितलेंच आहे. परंतु त्यांचें हें काम आतां कोण करणार ?

मरेपर्यंत अशी सांस्कृतिक व उद्बोधक कामगिरी ते करणार होते. ८५ वर्षेपर्यंत ही कामगिरी करून मग ते एकान्तवासांत रहाणार होते. केवढा हा आत्मविश्वास व आयुष्याच्या सार्थकतेसंबंधीं कोण ही महनीय खटपट.

या सर्व श्रमांची गुरुकिल्ली आपल्या समाजास जागें करणें यांत आहे. या बाबतींत ते कधीं कधीं उद्विग्न होत व हताश होत. परंतु पुनरपि प्रयत्नास लागत. शारदामंदीराच्या अध्यक्षस्थानीं असतां त्यांनीं मराठी भाषेचें व एकंदर भारतवर्षाचें एक दुर्दैवी चित्र काढलें होतें. मराठी भाषा मरत जाणार व हिंदुस्थान म्हणजे गुलाम

व राष्ट्राला पोषक अशी कृती होवो. आजपर्यंत फक्त राष्ट्रीय स्मृति तयार करण्यांत काळ गेला. यापुढें कृति, कृति, कृति झाली पाहिजे. नाही तर व्यर्थ! तालीम वगैरे आणखी सतत मेहनत झाली पाहिजे. आरोग्य, उत्तम हवा, उत्तम पाणी, उत्तम जागा, उत्तम शुद्ध अन्न हीं मिळालीं तर हेंही होईल. ईश्वराची कृपा अपरंपार पाहिजे ' याच टिपणाच्या दुसऱ्या बाजूस १८९४ पासून १९०९ पर्यंत केलेल्या कामगिरीचा तपशील दिला आहे व ७९०० पृष्ठें आतांपर्यंत मजकूर लिहून झाला — छापला असें सांगितलें आहे. या थोर पुरुषाची राष्ट्रकार्याबद्दलची ही तळमळ पाहून कांहीतरी करण्याची स्फूर्ति कोणास होणार नाहीं? हा उदारभाव, हा आशावाद मेलेल्यासही चैतन्य देईल. परंतु आम्ही मेलेल्याहून मेलेले आहोंत; त्यास कोण काय करणार? राजवाडे औंध येथें श्री. वैदिक पंडित सातवळेकर यांच्याजवळ राहणार होते. सातवळेकर त्यांस एक आश्रम बांधून देणार होते. तेथें राहून राजवाडे यांच्या मनांतून एक मासिक चालवायाचें होतें. वैदिक, पूर्ववैदिक, उत्तर वैदिक इतिहास यांत येणार होता. ऐतिहासिक व समाज विषयक शास्त्रपूत वृत्तान्त या मासिकांत यावयाचा होता. या मासिकांत दरमहा १०० पानांचा मजकूर ते स्वतःच देणार होते महाभारत, ब्राह्मणें या कालांतील अनेक गोष्टींवर शेंकडों निबंधाची रूपरेखा त्यांच्या मनांत होती. तसेंच वेदमंत्रांचें वर्गीकरण करून संगति लावून आपण स्वतः बसविलेल्या उपपत्तीप्रमाणें वेदांचा खरा अर्थ करून दाखवावा व या विषयावर हजार दोन हजार पानांचा ग्रंथ लिहावा असा त्यांचा मनोदय त्यांनीं सातवळेकरांजवळ अनेकदां व्यक्त केला होता. त्याप्र-

करावयाचें कठिणतर कर्तव्य स्वीकारलें होतें. बंगालमध्यें आशुतोष मुकर्जी यांनी जें कार्य केलें, तेंच कार्य एकाकी राजवाडे यांनीं महाराष्ट्रांत दृढमूल करण्याचा प्रयत्न केला. राजवाडे यांचा स्वभावावलंबाचा मार्ग मात्र आशुतोषजींच्या मार्गापेक्षां निराळा होता. आशुतोष यांनीं बंगाली भाषेस उत्तेजन दिलें. परंतु इंग्रजी शिक्षणावर त्यांचा कटाक्ष नसे. या कठोर कर्तव्यासाठी ते आमरण कष्टत असतां सुसंपन्न ग्राजुएटही सरकारच्या कचेरीं कसे लागतात याचें त्यांस राहून राहून नवल वाटे. आपल्या भिकारड्या चारित्र्याचा तिरस्कृत मानावा असें ते या ग्राजुएटांस सांगतात. " जोंपर्यंत शास्त्रांत तुम्ही गति करून घेणार नाहीं तोंपर्यंत तुमच्या तरणोपायाची आशा नाहीं "असे त्यांचे शब्द आहेत स्वराज्याच्या गप्पा मारणारे व गुलामगिरीचें दिवसभर काम करून रात्रीं देशभक्तांच्या कामाची उठाठेव करणारे लोक त्यांस तिरस्करणीय वाटत ते म्हणत दिवसभर राज्ययंत्र चालविण्यासाठीं त्यास तेल घालीत असतां व रात्रीं मात्र त्या राज्ययंत्राचा वाचिक निषेध करितां -यांत काय अर्थ आहे?" कधीं कधीं संतापून ते या लोकांस Biped द्विपाद पशु अशी संज्ञा देत. काय, शाळेंत मास्तर आहांत -- गाढव आहांत आलें. असें ते स्पष्टपणें म्हणत. कारण शाळेंत शिकून सरकारचें राज्ययंत्र सुरळीत चालविणारे गुलामच बाहेर पडणार ना असें ते म्हणत व जोंपर्यंत हा गुलामाच्या उत्पत्तीचा धंदा तुम्ही सोडला नाहीं तोंपर्यंत तुम्ही पशूच नाहीं तर काय असें राजवाडे बेमुर्वतपणें म्हणत-- यांतील इंगित वाचकांच्या लक्षांत येईलच.

स्वाभिमानशून्य जिण्याची त्यांस लाज वाटे. जदुनाथ

सरकारासारखे गाजलेले इतिहास लेखक शिवाजीस 'शिवा,' संभाजीस 'संभा' असे मुसलमानांच्या पद्धतीचें अवलंबन करून लिहितात याचा राजवाडे यांस मनस्वी संताप येई. मुसलमानांस शिवाजी हा काफर वाटे. परंतु सरकार तरी हिंदु रक्ताचे व हिंदू संस्कृति संरक्षण करणाऱ्याचा अभिमान बाळगणारे आहेत ना? मग या महाराष्ट्रास स्वातंत्र्य मंदिरांत नेऊन बसविणाऱ्या श्रेष्ठतर पुरुषांस सरकार असें हीन तऱ्हेनें कसें संबोधतात? आपल्या मधीलच पुढारी व विद्वान् समजले जाणारे लोक जर असें वर्तन करीत असतील तर मग कसली आशा राहिली? परकीय लोक तर हिंदुस्थानांतील सर्वच गोष्टींस नांवें ठेवणार. राजवाडे एके ठिकाणीं लिहितात "कार्ल्यांचीं व वेरूळचीं लेणीं केवळ हिंदुस्थानांतील म्हणून तीं साहेबास त्याज्य व पै किंमतीचीं. काश्मीर किंवा महाबळेश्वरसारख्या ठिकाणची शोभा केवळ हिंदुस्थानांतील म्हणून रद्द. शंकराचार्य, भास्कराचार्य हिंदुस्थानांत जन्मले म्हणून तुच्छ" — असें साहेबास हिंदुस्थानांतील वस्तूंचें वावडे असतें. परंतु स्वजनच जेव्हां आपल्या थोर पूर्वजांबद्दल अभिमान व पूज्यबुद्धि दाखवितनासे होतात तेव्हां काय रडावयाचें ही स्थिति पाहून, नैराश्यतिमिर पसरलेलें पाहून, कोणी कार्यकर्ता पुढें येत नाहीं असें पाहून राजवाडे कां संतापून जाणार नाहींत? त्यांस सर्व स्वजन तुच्छ कां वाटणार नाहीं?

असो. तर राजवाड्यांची मनोवृत्ति देशाभिमानानें प्रेरित झालेली होती. त्यांस पूर्वजांचे दुर्गुण स्पष्टपणें दिसत होते. शास्त्रसंवर्धन केलें नाहीं, कार्यप्रवणता ठेविली नाहीं, उद्योगधंदे, कारखाने, जगाकडे पाहून

विनिर्मिले नाहींत या सर्व चुका ते कबूल करितात. संघशक्ति, थोर व उदार विचारांचा पुरस्कार एक रामदास सोडले तर झाला नाहीं वगैरे चुका ते मानतात. परंतु पूर्वजांच्या चुका असल्या तरी त्यांची कर्तबगारी पण नांव घेण्यासारखी आहे. प्राचीनकाळ तर सोडूनच द्या. पाणिनि, पतंजलि, राम, कृष्ण, शंकर, रामानुज यांचा काळ आपण सोडून देऊं या महाविभूतींचा जन्म या थोर देशांत झाला म्हणून अभिमान पाहिजेच परंतु अर्वाचीन काळांतही पराक्रमी व कार्यधीर पुरुष झाले. त्यांची विस्मृति करून कसें चालेल ? विशेषतः राजवाडे यांस मराठेशाहींतील तीन व्यक्तींबद्दल फार आदर वाटे. श्री छत्रपति शिवाजी महाराज, समर्थ रामदासस्वामी, व श्रीमंत थोरले माधवराव साहेब पेशवे—या तीन विभूति—म्हणजे तीन परमेश्वरच त्यांस वाटत. महाराष्ट्रानें आपल्या हृदय मंदिरांत या तीन देवतांची सदैव पूजा करावी; त्यांच्या कार्याचें मनन करावें व त्यापासून आपली चुकतीं पाऊलें मार्गावर आणावीं. राजवाडे हे आपल्या संध्येनंतर यांतील विभूतींचें तर्पण करीत. प्राचीन ऋषींच्या नांवानें व आपल्या पूर्वजांच्या नांवें आपण तर्पण करितों. या त्रिमूर्ति म्हणजे महाराष्ट्राचे ऋषि होत. राजवाडे यांचें अंतःकरण या दिव्य मूर्तींच्या पराक्रमानें भरून येई यांत नवल नाहीं. कारण त्यांचें हृदय स्वदेश प्रीतीच्या शुद्ध मंदाकिनीनें भरलेलें होतें. स्वधर्म, स्वभाषा, स्वदेश-यांच्या बद्दलची जिवंत कळकळ, अकृत्रिम प्रेम होतें. याच प्रेमाच्या जोरावर, याच कळकळीच्या कैवारानें त्यांनीं अफाट कामगिरी एकाकी राहून केली. त्यांनां अंतःकरणांत स्फूर्ति देणारी, चालना देणारी, प्रेरणा देणारी प्रेरक शक्ति—स्वधर्म, स्वदेश व स्वभाषा

यांशिवाय अन्य कोणती असणार ?

देशाभिमानपूर्ण, जाज्वल्य व प्रखर अशा देशप्रेमानें भारलेला हा थोर पुरुष कशा मनोवृत्तीचा होता, त्यांच्या सर्व व्यवहारांतही कोणतें सूत्र अनुस्यूत होतें हें वाचकांच्या ध्यानांत आलें असेल. ही स्वदेशाची भावना, हा बाणेदारपणा, हा करारीपणा, निःस्पृहपणा त्यांच्या इतर बारीकसारीक गोष्टींतही कसा दिसून येई हें पुढील प्रकरणीं पाहूं.



## प्रकरण ७ वें



# स्वभावाशीं परिचय.



राजवाडे यांची राहणी साधी व स्वच्छ असे. त्यांचा आहार शुद्ध व सात्विक असे. ते बहुतेक हातानें स्वयंपाक करीत. कधीं कधीं ते भात दुधांत शिजवीत. मग त्या भातावर पुष्कळसा मध व तूप ओतून ते जेवीत. त्यांस मध भातावर फार आवडे. जेवणांत दूध तूप वगैरेंचा ते फार उपयोग करीत. परंतु नेहमींच असा आहार घेतां येत नसे. वाईस प्रथम ते दप्तर शोधावयास गेले, त्या वेळेस एक चिपटे तांदुळ घेऊन त्याचा भात करून नुसता खात; आणि ते म्हणत ' रोजच्या खर्चास मला तीन

दिडक्यांचे तांदुळ असले म्हणजे झालें. तीन पैशांत मला जगांत धडधाकट राहतां येईल.' नेहमीच अशा दरिद्रावस्थेंत त्यांस रहावें लागे असें नाहीं. परंतु सर्व प्रकारच्या परिस्थितींत रहावयास ते तयार असत. महिन्याचा त्यांचा भोजन खर्च कधीं कधीं कमींत कमीं १० रुपये तर जास्तींत जास्ती ३० रुपये पर्यंत जाई. त्यांचा सर्व खर्च त्यांच्या पुस्तक प्रकाशनांतून बाहेर पडत नसे; त्यांना इतर मदत घ्यावी लागे. त्यांच्या वडील भावांची—वैजनाथपंत राजवाडे-यांची त्यांस मदत होत असे. इतरांजवळून होतां होई तों त्यांनी कधीं पै घेतली नाही. कारण दुसऱ्यांचें मिंधे राहणें हें त्यांस कधीं खपत नसे. मिंधेपणा म्हणजे मरण असें ते म्हणावयाचे.

त्यांची प्रकृति दणगट असल्यामुळें त्यांचा आहार चांगला असे. अपचनासारख्या रोगांनीं ते कधीं आजारी पडले नाहींत. कधीं कधीं अटीतटीस पडून ते वाटेल तेवढ्या अन्न सामग्रीचा फन्ना उडवीत. एकदां अशीच पैज लागली व राजवाड्यांनीं १५० केळ्यांचा घड व ५।६ रुपयांचीं द्राक्षें यांचा फडशा पाडला. त्यांनां फळें फार आवडत. विशेषतः संत्रीं व केळीं यांची त्यांस मोठी आवड होती. भाजलेल्या भुईमुगाच्या शेंगावर त्यांची भक्ति फार होती. या शेंगा, त्याप्रमाणेंच संत्रीं व केळीं ते किती खातील त्याचा नेम नसे.

ते स्वच्छतेचे फार भोक्ते. गलिच्छपणा व गबाळपणा त्यांस तिळभरहि खपावयाचा नाहीं. त्यांचा पोषाख साधा व नीटनेटका असे. एक पंचा ते नेसत. अंगांत एक सदरा व कोट असे. डोक्याला

फेटा असे. बरोबर कांबळें अंथरावयास घ्यावयाचें. त्यांच्याजवळ कोट एकच असावयाचा. एखादें वेळीं कोट धुवून वाळलेला नसावयाचा—मग ते बाहेर जात नसत. ते स्वतः आपले कपडे पुष्कळ वेळां धुवीत. कऱ्हाडास ज्या ज्या वेळेस असत, तेव्हां कृष्णेवर जाऊन ते आपले कपडे धुवून आणीत. ते हातानें स्वयंपाक करण्याचें पत्करीत. यांत स्वच्छताच हा त्यांचा मुख्य हेतु असे. खानावळीचें अन्न त्यांस पसंत नसे; त्याची त्यांस खंत येई. खानावळी म्हणजे कितपत स्वच्छ असतात हें त्यांत जाणारांस तरी सांगण्याची जरूरी नाहीं. पुण्यास असतां अलीकडे अलीकडे अगदीं फार थोडे दिवस त्यांनीं एक स्वयंपाक्या ठेविला होता. त्याचे हात वगैरे ते आधीं पहात. खरूज वगैरे दिसली तर त्यास ते दूर करीत. त्यांचीं स्वयंपाकाचीं भांडीं महाराष्ट्रांत अनेक ठिकाणीं ठेवलेलीं असत. ठिकठिकाणीं त्यांच्या उतरण्याच्या जागा ठरल्यासारख्या होत्या. ते फिरावयास जातांना सुद्धां शेतांभातांतून जाणें पसंत करीत. कारण रस्त्यांतून भयंकर धूळ असते. ते म्हणत ' जोंपर्यंत आपल्याकडील म्युनीसिपालट्यांस रस्ते शिंपण्याची अक्कल आली नाहीं व आवश्यकता वाटत नाहीं तोंपर्यंत अशा धुळीच्या लोटानें भरलेल्या रस्त्यांतून चालणें व नासिकारंध्रें भरून घेणें म्हणजे क्षय रोगानें मरण ओढवून घेण्याप्रमाणें आहे. ' पुण्यांतील रस्ते किती घाणेरडे व मलमूत्राक्लिन्न असतात याविषयीं ते पुण्यांतील एका व्याख्यानांत म्हणाले ' मला या सभास्थानीं येईपर्यंत वाटेंत घाणींत पाय भरल्यामुळें १०—१२ वेळां पाय नळावर धुवावे लागले.' त्यांना आंघोळ वगैरे करण्यासही पुष्कळ पाणी लागे. एका

चादलीभर पाण्यांत काकस्नान करणें त्यांस आवडत नसे. ५—६ तंगाळें पाणी असल्याशिवाय त्यांची आंघोळ व्हावयाचीच नाहीं. त्यांची शरीर प्रकृति निकोप होती. कॉलेजमध्यें भरपूर व्यायाम घेतलेला असल्यामुळें त्यांची शरीरयष्टि कणखर लोखंडाच्या कांबीसारखी झाली होती. मोठेपणीं कधीं कधीं ते नमस्कारांचा व्यायाम घेत, परंतु पुढें पुढें ते फिराव-पास जाण्याचाच व्यायाम घेत. चहा वगैरे अग्निमांद्य आणणाऱ्या पदार्थांचा ते तिरस्कार करीत. ते खेदानें म्हणत " अलीकडील लोकांच्या खिशांत चहा घेण्यास दोन आणे खुळखुळतात; परंतु तेवढ्याच पैशांत अर्धा मूठ बदामगर, दोनचार खडीसाखरेचे खडे, १०।१२ काळीं द्राक्षें—असा माधवरावी मेवा घेतां येईल. ( माधव-रावी म्हणजे न्या. माधव गोविंद रानडे—यांचा मेवा. रानडे यांच्या खिशांत बदाम, पिस्ते वगैरे असावयाचे ) मी हा मेवा घेतों म्हणून तर माझे दंड पीळदार व डोळे पाणीदार आहेत.

राजवाडे यांचें मुखमंडल पाहून आपणांस इटालियन देशभक्त मॅझिनी यांची आठवण होत असे, असें नरसोपंत केळकर यांनी लिहिलें आहे. राजवाडे हे मॅझिनीप्रमाणेंच विचार क्रांति घडवून आणणारे व देशभक्त होते. राजवाडे यांची हनुवटी लांब व निश्चय दर्शविणारी होती. डोळे कोठें तरी दूर गेले आहेत असे दिसत. डोळ्यांत एकप्रकारची निःस्पृहता होती. नाक स्वतंत्र वृत्तीचें व तीक्ष्ण बुद्धीचें दर्शक होतें. त्यांचें कपाळ भव्य होतें. ते मध्यम उंचीचे होते. एकंदरीत त्यांचें शरीर भक्कम व जोरदार, स्फूर्तीचें घर होतें. या जोरदारपणांतच त्यांच्या आशावृत्तीचें बीज आहे. त्यांचा आत्म-

विश्वास दांडगा होता. आपण म्हणूं तें करूं असें त्यांस वाटे. अजरामरवत् संकल्प करून ते कार्यास प्रवृत्त झाले होते. आपण पूर्ण शतायुषी होऊन मगच मरूं असें ते म्हणावयाचे. ८०।८५ वर्षे पर्यंत काम करून मग १०।१५ वर्षें एकांतांत विश्रांति घ्यावयाची असें त्यांनीं ठरविलें होतें. केवढा हा आत्मविश्वास ! निरुत्साही व रडक्या लोकांची त्यांस चीड येत असे. मी आजारी आहें, कपाळ दुखतें आहे, कसें काम करावें—असें रडगाणें गाणाऱ्या लोकांस उद्देशून ते म्हणत ' मरा लेको आजच मरा; तुम्ही जितके लौकर मराल तितकें चांगलेंच. कारण आपल्या रडगाण्यांनीं तुम्ही दुसऱ्यासही नाउमेद करतां. आत्महत्या व परहत्या अशीं दोन्हीं पातकें तुम्ही त्यामुळें करीत आहांत " राजवाडे ह्मणजे मूर्तिमंत उत्साह व आशा होय.

ध्येयशून्य व परप्रत्ययनेयबुद्धि अशा लोकांचाही त्यांस संताप येई. एकदां वऱ्हाडांत एका विद्वान् गृहस्थानें त्यांस विचारलें " मी काय करावें असें तुमचें मत आहे ? मी कोणत्या कार्यास लायक आहें असें आपणांस वाटतें ? " राजवाडे रागानें म्हणाले ' तुम्ही मरावयास मात्र लायख आहांत.' ज्या गृहस्थास इतके दिवस जगांत राहून आपण कोणत्या कार्यास लायक आहोंत हें समजलें नाहीं, तो दुसऱ्यानें सांगितलेल्या गोष्टींवर श्रद्धा ठेवून काय कार्याचे दिवे लावणार हें त्यांस दिसतच होतें. आपली बुद्धि, आपली कुवत, आपली हिंमत ओळखून ज्यानें त्यानें आपलें कार्यक्षेत्र ठरविलें पाहिजे. दुसऱ्यानें सांगून काय होणार ? आपल्यांतील पुष्कळ तरुण लोक असेच असतात.

कॉलेजमध्यें ऐच्छिक विषय कोणता घ्यावा हें ते प्रोफेसरास जाऊन विचारतात ! निरनिराळीं कार्यक्षेत्रें त्यांच्या डोळ्यांसमोर उभीं नसतात; व उभीं राहिलीं तरी आपण कोणत्या कार्यक्षेत्रांत काम करण्यास लायक आहोंत हें त्यांचें त्यांस समजत नाहीं. एक नोकरीचें क्षेत्र वगळलें म्हणजे अन्य क्षेत्र पांढरपेशांस दिसतच नाहीं. ज्ञानार्जनांतील निरनिराळ्या क्षेत्रांत धडाडीनें उडी घ्यावी व तेथें चमकून देशाचें व स्वतःचें नांव चिरस्मरणीय करावें असें कोणाच्याही ध्यानीं मनीं येत नाहीं. निरनिराळ्या ललितकलांत प्राविण्य मिळवावें हें पण त्यांस पसंत नसतें. व्यापारवृद्धि करून संपत्ति वरास आणण्याचा विचारहि अंतःकरणांत उदय पावत नाहीं. ही सर्वत्री निरुत्साही वृत्ति पाहून राजवाडे संतापत यांत नवल नाहीं. महाराष्ट्रांत धडाडीनें काम करणारे पुष्कळ लोक नाहींत म्हणून ते निराश होत. परंतु स्वतःच एकटे एकान्तिक निष्ठेनें ते पुढें पाऊल टाकीत होते.

जवळज्जहाल वृत्तीनें कार्यास आजन्म वाहून घेणारे कामसू लोक आढळत नाहींत म्हणून ते चिडखोर व रागीट बनले. ' पुरतें कोणाकडे पाहेना, पुरतें कोणाशीं बोलेना ' अशा बेदरकार वृत्तीचे ते बनले. कार्य करावयास नको. फुकट मोठाल्या गप्पा मात्र मारावयास पाहिजेत—असें लोकांचें खरें स्वरूप पाहिल्यामुळें ते त्यांच्या जवळ तिरस्कारानें व तुच्छतेनें वागत; कधीं कधीं केवळ लहरीपणा पण असे. त्यास कोणी कांहीं विचारावयास गेलें तर प्रथम त्यास उडवाउडवीची, तुसडेपणाचीं उत्तरें ते देत. परंतु जर त्यांनां असें दिसून आलें कीं आलेला इसम खरोखर विचार ग्रहण करण्याच्या

हेतूनें आला आहे, तो तुच्छ व हीनवृत्तीचा नसून उत्कटता त्याच्या ठिकाणीं आहे, तर मग ते त्या गृहस्थाजवळ नीट दोन दोन तासही मनमोकळेपणानें व हास्ययुक्त मुद्रेनें बोलत मग त्यांच्या कपाळावरच्या आंठ्या मावळत व भालप्रदेश प्रशांत दिसे. विद्येचें व विद्वत्तेचें मंगल गांभीर्य व तेज त्यांच्या मुखावर दृग्गोचर होई. गाईचा खरा वत्स पाहिजे; नाहीं तर ती लाथच मारावयाची तसें खरा ज्ञानोत्सुक गृहस्थ पाहिला म्हणजे राजवाडे यांचें होई. एकदां आपल्या तिरसट वागणुकीचें रहस्य सांगतांना ते म्हणाले " अहो, मी लोकांजवळ आधींच शिव्या शाप देऊन बोलूं लागतों; म्हणजे मागून त्यांची भीड पडावयास नको. आधीं जर गोडी गुलाबीनें, मृदु स्वभावानें लोकां-जवळ आपण वागलों तर त्याच लोकांजवळ प्रसंग विशेषीं निःस्पृह-पणें बोलतां येत नाहीं. मनांत येतें, काल आपण यांच्याजवळ साळसूदपणानें बोललों, चाललों, मग आतां यांचें मन कसें दुखवावयाचें – अशी भीड – जी भिकेची बहीण म्हणतात – ती पडूं नये व निर्भीडपणें व सडेतोडपणें सर्वांजवळ बोलतां चालतां यावें म्हणून मी कोणास जवळ करीत नाहीं. निःस्पृहस्य: तृणं जगत् – या न्यायानें मी वागतों." राजवाडे स्वतंत्र वृत्तीचे होते. कधीं कोणाची पै मी लागत नाहीं या अभिमानानें ते वागले व राहिले. राजा असो रंक असो सर्वांशीं त्यांचा खाक्या सारखाच.

राजवाडे यांच्यामध्यें मनाची एकाग्रता हा गुण फार उत्कृष्ट-पणें होता. कनक व कांता या मनास व्यग्र व लोल करणाऱ्या दोन वस्तूंपासून तर ते दूर होते. या वस्तूंचा त्यांनीं संपूर्णतः त्याग केला होता. त्यामुळें त्यांच्या मनाची एकाग्रता सहजतेनें होई.

दहा दहा बारा बारा तास ते मांडी घालून झपाझप बोरूनें कधीं कधीं टाकानेंही बंदावर बंद लिहून काढीत. ते मोडींत लिहीत व त्याचें छापण्यासाठीं बालबोध कोणाकडून करून घेत. त्यांचें मोडी अक्षर गोलबंद मोत्यासारखे होतें. त्यांच्या अक्षरास सुंदर वळण असे व ते सहज भासे. असें लिहित असतां आजुबाजूंचा सावळा गोंधळ त्यांस संत्रस्त करूं शकत नसे. एकदां ते इंदूरला गेले होते. ते ज्या खोलींत लिहावयास बसत, त्या खोलीच्या शेजारच्या खोलींत एक शॉर्ट हँड टाइपरायटिंगचा क्लास असे. तेथें पुष्कळ मोठ्यानें बोलणें, चालणें होई. आपणांस फार त्रास होत असेल, आपल्या लिहिण्या वाचण्यांत व्यत्यय येत असेल, परंतु माफ करा, असें त्यांस म्हटल्याबरोबर राजवाडे म्हणाले ' त्यांत त्रास कसचा—मला बिलकूल त्रास वगैरे होत नाहीं. मुलें काय व माकडें काय सारखींच. त्यांच्या गोंगाटानें आपलीं डोकीं नाहींशीं होतां कामा नये. तुम्हीं आम्ही डोक्यानें मजबूत असलें पाहिजे म्हणजे झालें. ' ते बहुधा सकाळच्या वेळीं महत्वाचें वाचन करीत; दुपारीं १२ ते ३ पर्यंत किरकोळ सटर फटर वाचीत. सकाळीं जें वाचलें असेल, त्यावर ते दोनप्रहरीं व सायंकाळीं मनन करावयाचे. कधीं कधीं डोक्यांत एखादा विचार येऊन ते सारखे मननच करीत बसलेले दिसावयाचे. एकदां कऱ्हाडास असतां ते असेच कांहीं गंभीर विचारांत नेहमीं मग्न व गढलेले असत. ते ज्या स्नेह्याकडे उतरले होते त्या स्नेह्यानें विचारलें " अलीकडे सर्व वेळ आळशासारखाच आपण दवडतां एकूण; तुमचें वाचन वगैरे कांहींच हल्लीं नाहीं. " त्यावर राजवाडे म्हणाले " अरे आतां पाहशील एकदां लिहावयास लागले

म्हणजे कसें लिहिन तें. " त्यांची ती शांति समुद्राच्या शांतीप्रमाणें असे. समुद्राची शांती हें भावी वादळाचें जसें चिन्ह समजतात, तसें राजवाड्यांची शांती म्हणजे नवीन क्रांतिकारक विचारांनीं वादळ उठविण्याची ती खूण होती. पोटांत, मेंदूंत त्यांच्या विचारांचें थैमान, धुडगूस चालूच असे व या आंतरिक मंथनापासून कांहीं तरी सिद्धांतरूपी नवनीत ते जनता जनार्दनाला अर्पण करीत.

राजवाडे यांना चातुर्वर्ण्याची उपयुक्तता पटत असावी. समर्थ रामदास स्वामींनीं सवगोलंकार दूर करून चातुर्वर्ण्याची घडी पुन्हां बसविण्याचा प्रयत्न केला. समर्थांना ' एकंकार गजावरि पंचानन ' असें म्हटलेलें आहे. सव गोलंकाररूपी गजाचा संहार करणार समर्थ हे पंचानन होते. संत मंडळींनी समत्वाचा प्रसार केला परंतु चातुर्वर्ण्याविरुद्ध त्यांची शिकवणूक नव्हती; त्यांस एवढेंच शिकवावयाचें होतें कीं प्रत्येक वर्णानें वर्णाश्रमानुरूप कर्मे करावीं परंतु आपण वरिष्ठ इतर कनिष्ठ ही वृत्ति सोडून द्यावी. वर्णांनीं एकमेकांचा तिरस्कार करूं नये. समाजाच्या हितासाठीं एकमेकांनीं त्याग वृत्ति स्वीकारून आपापलीं कर्मे करावींत. राजवाडे याच मताचे होते. ते म्हणत ' मी ब्राह्मण आहें, म्हणून मी निःस्पृह वृत्तीनें व निर्धनतेनें राहून ज्ञानार्जनांत आयुष्य दवडीत आहे. माझें हें प्राप्त कर्तव्यच आहे. पैशांचा संचय करणें हें माझें काम नव्हे. हांजी हांजी करणें हा ब्राह्मण धर्म नाहीं. मी वाणी झालों असतों तर वाण्याचें दुकान चालविलें असतें; मी व्यापार उदीम केला असता. ' या उक्तींत राजवाड्यांच्या आयुष्याचें सार आहे. राजवाडे रहात होते

राहात होते त्याप्रमाणें निःस्पृह, निर्धन परंतु ज्ञानधन व मानधन असे वैराग्यवृत्तीचे ब्राह्मण आपणांत किती आहेत? सर्व ब्राह्मण जवळ जवळ शूद्रच झाले आहेत असें म्हटलें तर वास्तविक कोणास राग न येतां लाज वाटली पाहिजे.

स्वार्थत्यागाच्या वायफळ गप्पा राजवाडे यांस खपत नसत. स्वार्थत्याग कार्यकर, प्रभावशाली पाहिजे. ज्या स्वार्थत्यागाचा उपयोग नाहीं त्या स्वार्थत्यागाची कांहीं अदृष्ट किंमत असली तरी प्रत्यक्षाच्या दृष्टीनें तो स्वार्थत्याग अनाठायीं आहे. निरनिराळ्या शिक्षण संस्थांतील लोक कमी पगारावर कामें करितात व आपण स्वार्थत्यागी आहोंत असें त्यांस वाटतें; परंतु राजवाडे म्हणत " कमी पगार घेतां, परंतु करतां काय? नोकरशाहीचा गाडा सुरळीतपणें चालविणारे गुलामच निर्माण करितां कीं नाहीं? असे हमाल तयार करण्यासाठीं केलेला स्वार्थत्याग म्हणजे राष्ट्रद्रोह आहे. कारण राष्ट्राची कुचंबणा करणारें जें परकी सरकार, त्याला एकप्रकारें साहाय्यच तुम्ही असे लोक निर्माण करून करतां. असला स्वार्थत्याग अनाठायीं आहे. चांगला लठ्ठ पगार घेत जा. ज्ञानक्षेत्रांत काम करून ज्ञानाच्या सीमा वाढवा. परंतु हें कार्य आमचे हे स्वार्थत्यागी विद्वान् कितीसें करतात? निरनिराळ्या कॉलेजांमधून असणाऱ्या आचार्यांनीं ज्ञानाच्या कोणत्या शाखांत स्वतंत्र व स्पृहणीय भर घातली आहे? कोणते अभिनव व उदात्त ग्रंथ निर्माण केले आहेत? या सर्व गोष्टींच्या नांवानें जर शून्याकार असेल, त्याचप्रमाणें शाळा कॉलेजांतून बाहेर पडणारे विद्यार्थी सेवावृत्तीस आलिंगन देण्यास उत्सुक, मानहानी मुकाट्यानें सोसणारे, गतप्राण, नेभळट असेच

निर्माण होत असतील तर या स्वार्थत्यागाचा उपयोग काय ? तेजस्वी व तडफदार अशी तरुणपिढी तरी निर्माण करा की जी पिढी इंग्रजांस लाथ मारून हांकलून देणें हेंच जीवित कार्य मनांत धरून ठेवील, किंवा ज्ञानप्रांतांत तरी अलौकिक कामगिरी करा कीं जेणें करून भारतवर्ष इतर प्रगमनशील राष्ट्रांच्या जोडीनें आपली जागा घेईल. परंतु या दोन्ही गोष्टींपैकीं कोणतीहि गोष्ट ज्या स्वार्थ-त्यागी लोकांकडून- शिक्षण संस्थांकडून होत नाहीं—त्यांनीं उगीच मोठेपणाची हौस कशास मिरवावी ? राजवाडे अशा स्वार्थत्यागाची टर उडवीत. खरे ज्ञानाचे उपासक आपणांकडे नाहींत म्हणून त्यांस विषण्णता येई. यामुळेंच आपल्या मुंबई युनिव्हर्सिटीसारख्या क्रिया-शून्य अगडबंब मढ्यास ते म्हातारगंड युनिव्हर्सिटी म्हणत. याच विषण्णतेमुळें काशीच्या भारतधर्म महामंडळानें ' पुरातत्त्व भूषण ' ही पदवी राजवाडे यांस मोठ्या प्रेमानें दिली असतां, राजवाडे यांनीं तें प्रमाणपत्र ( सर्टिफिकेट ) ज्या नळकांड्यांत होतें तें नळकांडें घेण्याची उत्सुकता दर्शविली नाहीं. श्रमांची योग्यता व विद्वत्तेची खरी किंमत समजणाऱ्या पुरुषाकडून गौरव केला गेला, तर तो गौरव स्पृहणीय असतो; परंतु ज्यास विद्वत्तेबद्दल श्रम करावयास नकोत, विद्वत्तेबद्दल, ज्ञानाबद्दल खरी उत्कंठा नाहीं, विद्वत्तेच्या वा ज्ञानाच्या दृष्टीनें ज्यांच्याजवळ भोपळ्या एवढें पूज्य अशानें केलेला मान व गौरव जास्तच उद्वेगकारक वाटतो. गुणवंत गुणांचें गौरव करूं जाणतो; अगुणास तें शक्य नाहीं व त्यानें केलें तर तें गौरव हास्यास्पद होतें. आपली योग्यता जाणणारे विद्वान् नाहींत म्हणून राजवाडे खिन्न होत. आपले ग्रंथ समजण्याची

पात्रता नाहीं म्हणून विद्वानांची त्यांस कींव येई. आजपासून २० वर्षांनीं माझे ग्रंथ समजूं लागतील असें ते म्हणत. त्यांच्या व्याकरणाचा उपयोग फक्त पंडित करतात; परंतु आपल्याकडील लोकांस तें समजण्याची पात्रता नाहीं. या उद्वेगजनक प्रकारानें कोणा ज्ञानाभिमान्यास विरक्तता व संतप्तता प्राप्त होणार नाहीं? यासाठीं राजवाडे या नव सुशिक्षितांस, शाळा कॉलेजांतून शिकविणाऱ्यांस तुच्छतेनें कारकून म्हणत व त्यांच्या स्वार्थत्यागाची पै किंमत ठरवीत. ज्ञानप्रांतांत कै. भांडारकर, टिळक वगैरे कांहीं गाढ्या पंडितांबद्दल राजवाडे आदरानें बोलत, परंतु टिळकांनींहि आपले ग्रंथ इंग्रजींत लिहिले म्हणून त्यांसहि नांवें ठेवण्यास या बहाद्दरानें कमी केलें नाहीं.

मराठी भाषेबद्दल त्यांचा अभिमान पराकोटीस पोंचलेला होता. इंग्रजी भाषेंत व्यवहार करणाऱ्यांवर ते खवळावयाचे. फक्त १८९१ मध्यें एकदां ते इंग्रजींत बोलले होते-का तर पीळानें, ऐटीनें. "साहेब काय इंग्रजींत बोलतो, मी सुद्धां फर्डें बोलून दाखवितों" अशा इरेनें ते बोलले. पत्रव्यवहार त्यांनीं बहुतेक इंग्रजींतून केला नाहीं. पत्रें ते मोडींत व कधीं कधीं संस्कृतमधून लिहीत. भाषेचा जसा अभिमान, त्याप्रमाणेंच आचाराचा पण त्यांस अभिमान होता. पंचा नेसून प्रयोग शाळेंत काम केलें तर ऑक्सिजन निर्माण होत नाहीं कीं काय असें त्वेषानें ते विचारीत. स्वभूमि, स्वभाषा, स्वजन व स्वधर्म यांना वाहिलेलें त्यांचें आयुष्य होतें व त्यांच्या सर्व बारीक गोष्टींतही ही गोष्ट सूर्यप्रकाशाप्रमाणें स्वच्छ दिसते.

राजवाडे रागीट होते. महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचे अध्वर्यु

विजापूरकर त्यांस प्रेमानें दुर्वास म्हणत व कोल्हापुरास ते जें घर बांधणार होते तेथें या दुर्वासांसाठीं ते एक स्वतंत्र खोली ठेवणार होते. राजवाडे कधीं कोणाकडे उतरले तर त्यांच्या पोथ्या पुस्तकांची पोतीं, रुमाल त्यांच्याबरोबर असावयाचेच. 'माझ्या पुस्तकांस पोराबाळांनीं हात लावला तर मी थोबाडींत देईन' असें प्रथमच सांगून मग ते तेथें रहावयाचे. म्हणजे मागाहून भांडण व्हावयास नको. आधींच हडसून खडसून असलेलें बरें. कधीं कधी त्यांचा राग अनावर होई व त्या रागाच्या भरांत ते वाटेल तें बोलत. एकदां ग्वाल्हेरीस एका भिक्षुकाजवळ ते एक महत्त्वाची जुनी पोथी मागत होते. त्या भिक्षुकानें ती पोथी दिली नाहीं, तेव्हां संतापानें राजवाडे म्हणाले " तुझ्या विधवा बायकोपासून मी सर्व पोथ्या घेऊन जाईन." हेतू बोलण्यांतील हा कीं या पुस्तकांची व पोथ्यांची तुझ्या मरणानंतर तुझी बायको रद्दी म्हणून विक्री करील. वाण्याच्या दुकानांत माल देण्यासाठीं मग या रद्दीचा उपयोग होतो. राजवाडे यांनीं वाण्याच्या दुकानांतून कित्येक महत्वाचे कागद विकत घेतले होते. वऱ्हाडांत एकदां हिंडतांना एका वाण्याच्या दुकानांत १-२ दौलताबादी जुने कागद त्यांनीं पाहिले. त्या वाण्याजवळ आणखी ४-५ कागद होते. राजवाडे यांस ते कागद महत्त्वाचे वाटले म्हणून ते कागद त्यांनीं वाण्याजवळ मागितले परंतु तो वाणी देईना. राजवाडे सांगतात 'मी ढळढळां रडलों तरी तो वाणी कागद देईना. शेवटीं कनवटीचा रुपया फेंकला—तेव्हां त्या वाण्यास दया आली व ते कागद मला मिळाले.' असे महत्त्वाचे कागद ज्यांच्या घरांत असतात, त्यांना त्यांचें महत्त्व समजत नसतें; रुमाल बांधलेले

ऽ खात असतात; फार तर दुसऱ्याच्या वेळेस त्यांची डपूस होऊन, त्यांच्यावर गंधाक्षता पडावयाच्या. आणि ांत कर्ता, मिळविता कोणी राहला नाहीं म्हणजे या पोथ्या रद्दी ाणून वाण्यास विकावयाच्या असें नेहमीं होत आलें आहे. राज-डे यांनीं या गोष्टी पाहिल्या होत्या व म्हणून त्यांनीं त्या ब्राह्मणा-वळ पोथी मागितली असतां त्यानें दिली नाहीं म्हणून ते भरम-ाट अशुभ बोलून गेले. परंतु त्यांचा हा राग त्यांना आलेल्या टु अनुभवाचा परिणाम होता. अनेक अनुभवांचा तो उद्रेक होता यांच्या विक्षिप्तपणांतही व्यवस्थेशीरपणा होता, तसेंच त्यांच्या रागा-ही कांहीं तरी सबळ कारणें असत. निष्ठेनें कार्य करीत असावें. याच्यासाठीं अनंत कष्ट करावे आणि स्वजनांकडून अल्पस्वल्प अशी दतही होऊं नये अशा वेळीं अशी जळजळीत वाणी तोंडांतून बाहेर पडली तरच आश्चर्य. 'ज्याचें जळतें त्यास कळतें'—इतर ार्याविषयीं उदासीन असणाऱ्यांस या रागाचें, या क्रोधाचें आश्चर्य ाटेल व काय विक्षिप्त व आततायी हा राजवाडे असें ते म्हणतील रंतु राजवाडे यांस असे उद्गार काढावयास लावणारीं माणसं आमच्या देशांत आहेत ह्मणून मात्र आह्मांस वाईट वाटतें व राज-वाडे यांच्या कार्यनिष्ठेबद्दलचा आदर दुणावतो आणि या महापुरु-षाचें अंतःकरण कसें कार्यासाठीं तिळतिळ तुटत असेल तें मनास समजून येतें.

ईश्वरावर त्यांची आयुष्याच्या पूर्वार्धांत श्रद्धा होती. पर पन्नाशी उलटल्यावर या मतांतही उलटापालट झाली. त्यांनीं वया ४६ वें वर्ष लागलें असतां जें उद्बोधक टिपण लिहिलें आहे, त्या

ते म्हणतात ' ईश्वराची कृपा भरपूर पाहिजे ह्मणजे सर्व होईल.' हा विश्वास पुढें राहिला नाहीं. ईश्वर ही एक मानवी भ्रांत कल्पना आहे असें ते ह्मणूं लागले नास्तिपणाकडे ते झुकूं लागले. परंतु समाजदेवाचें अमरत्व व अस्तित्व त्यांस मान्य होतें व त्यासाठीं ते रात्रंदिवस खटपट करीत होते. ईश्वरावर श्रद्धा ठेवून ईश्वरास संतुष्ट करण्यासाठीं. परलोकीं परमेश्वर प्रसन्न व्हावा यासाठीं कार्यें करणारे लोक थोर खरे; परंतु अशा लोकांस कार्य करण्यास उत्साह देणारा परमेश्वर हा आधार तरी असतो; परंतु ज्यांस ईश्वरी आधारानेंहि सौख्य नाहीं, असे राजवाड्यांसारखे लोक, पारलौकिक सुख वगैरे कांहीं न मानतांही, मरणानंतर कांहीं आहे असें न मानतांही केवळ निरपेक्ष दृष्टीनें कामें करतात, याचें कौतुक वाटतें व त्यांच्याबद्दल मनांत जास्तच आदर व पूज्यभाव वाटतो.

महाराष्ट्राच्या पूर्ववैभवासंबंधीं ते आदरानें बोलत. परंतु सध्यांच्या महाराष्ट्राच्या औदासिन्याबद्दल ते खिन्न होते. स्वार्थत्यागवृत्तीस महाराष्ट्रांत मान नाहीं, खरा स्वार्थत्याग, खरी कार्यवृत्ति, खरा कार्यकर्ता यांची किंमत महाराष्ट्रीयांस होत नाहीं असें त्यांस वाटे. काव्हूर या इटलीमधील मुत्सद्याच्या चरित्राच्या प्रस्तावनेंत ते लिहितात " स्वार्थत्यागाची किंमत समजणारी अक्कल समाजांत नसेल तर स्वार्थत्याग गाभटतो. " लो. टिळक यांच्या केसरी पत्रासंबंधीं ते म्हणत " या पत्रासाठीं बळवंतराव एवढी झीज सोसतात; त्यांतील अग्रलेखांनीं व स्फुटांनीं सबंध दक्षिण व वऱ्हाड नागपूरचा भाग त्यांनीं हालवून सोडला आहे, तरी या पत्राच्या प्रती लाखांनीं कां खपूं नयेत ! महाराष्ट्र एक दरिद्री तरी असला पाहिजे, नाहीं

तर कंजूष तरी असला पाहिजे. प्रत्येक गांवांतील मारुतीच्या देवळां-तून केसरी मोठ्यानें वाचला जाऊन तो लोकांनीं ऐकावा असें झालें पाहिजे. राजकीय विचारांचे लोण सर्वत्र नेऊन पोंचविलें पाहिजे" महाराष्ट्राच्या औदासिन्याबद्दल जरी ते असे उद्गार काढीत असले तरी कधीं कधीं जनतेवर असलेला आपला विश्वास ते प्रकट करीत. इतिहास साधनांच्या एका खंडांतील प्रस्तावनेंत ते लिहितात " कार्य करविता स्वदेशांतील अभिमानी समाज आहे. " खऱ्या स्वार्थ-त्यागाची बूज जनता केल्याशिवाय राहणार नाहीं असें ते म्हणत. 'हें राज्य व्हावें असें श्रींच्या मनांत फार आहे.' या शब्दांनीं श्रीशिवछत्रपतींनीं आपली श्रद्धा बोलून दाखविली—त्याप्रमाणेंच राजवाडे यांनीं जनतेवरील श्रद्धा बोलून दाखविली आहे. 'कार्यकर्त्या मनुष्यास महाराष्ट्र, सर्व भारतवर्ष उपाशीं मरूं देणार नाहीं' असा विश्वास ते प्रगट करीत असत. त्यांचा राग जनतेवर नसून अर्ध्या हळ-कुंडानें पिंवळे होणाऱ्या अर्धवट सुशिक्षितांवर असे असें विचार केला म्हणजे वाटतें.

राजवाडे हे निर्व्यसनी होते हें सांगण्याची जरूरी नाहीं. ते विरक्त व संन्यस्त वृत्तीनें राहिले हें सर्वांस महशूर आहे. फक्त विडीचें व तंबाकूचें त्यांस व्यसन होतें. परंतु या व्यसनांचेंहि राजवाडे गुलाम झाले नव्हते. कित्येक दिवस ते विडीशिवाय खुशाल राहूं शकत व विडी ओढावयास न मिळाल्यामुळें कपाळ वगैरे दुखलें असेंहि त्यांस होत नसे. एकदां त्यांच्या एका स्नेह्यानें हजार पंधराशें विड्यांचा एक गठ्ठा दिला, त्यावेळेस ते रोज रोज ४०।५० विड्या ओढीत. परंतु त्यांस विचारलें असतां

ते म्हणाले ' सध्यां आहेत म्हणून मी ओढतों, मी विकत घेऊन कांहीं ओढीत नाहीं; परंतु ते कधीं विकतही आणीत असत; तथापि व्यसनाचे ताब्यांत न जातां व्यसन त्यांनीं आपल्या ताब्यांत ठेविलें होतें. लिहितांना कधीं तोंडांत तंबाखू टाकून ते चवळावयाचे.

त्यांना स्वतःच्या राहत्या जागेच्या भोंवतीं गुरेंढोरें आलेलीं खपत नसत. गुरांमुळें घाण होते व मग डांस वगैरे होतात असें त्यांचें मत असे.

राजवाडे यांचा स्वभाव जरा भित्रा होता. ते फिरावयास गेले तरी काळोख पडण्यापूर्वी परत यावयाचे. ६ वाजल्यानंतर ते फिरावयास जात नसत. माघारे यावयाचे. त्यांना सापाविंचांची फार भीति वाटे. पावसाळ्यांत ते फिरावयास जात नसत. तसेंच हिरवळीच्या जागेवरून. कुंपणावरून वगैरे फिरण्यास त्यांस भीति वाटे. कारण अशा ठिकाणीं सर्प वगैरे फार असतात. त्यांच्या-बरोबर त्यांचा सोटा नेहमीं असावयाचाच.

परंतु ही भीति केवळ आपल्या चुकीमुळें आपण जीवितास वगैरे मुकूं नये अशा स्वरूपाची असावी. नाहीतर ते व्यक्तीस किंवा समाजास भीत नसत. सरकारवरही त्यांचा विश्वास नसे व सरकार संबंधीं सडेतोड उद्गार त्यांनीं काढले आहेत, ह्मणजे ही भीति केवळ भ्याडपणाची नव्हती. भ्याडपणा, ताटाखालचें मांजर होण्याची जी दीन व दुबळी वृत्ति ती ही नव्हती. ती त्यांच्या स्वभावाशीं विसं-गतच असली पाहिजे. प्रत्येक व्यक्ति तडफदार, तेजस्वी व निःस्पृह बनावी अशी तर त्यांची जन्मशिकवणुक आहे. विद्यार्थी व तरुण लोक यांनीं नामर्द व लुसलुशीत वृत्तीचे न होतां रणमर्द जवा-

नमर्द व्हावे असें त्यांस खरोखर वाटे. गाणें बजावणें, नाच, कोमळ व नाजुक वाद्यें यांचा त्यांस तिटकारा येई. त्यामुळें वृत्ति बायका होतात असें त्यांस वाटे. विश्ववृत्ताच्या १९०७ सप्टेंबरच्या अंकांत ते लिहितात " कुंई कुंई, किणकिण, गुंईगुंई वगैरे नरम आवाज उत्पन्न करणारी सतार, दंतवाद्य, गिटार वगैरे भिकार वाद्यें खुद्द भीमसेनालाहि बृहन्नडा बनवतील; मग सामान्य पोलीस, शिपाई व खडर्येवाशे यांना त्यांनीं साक्षात् स्त्रैणपणा आणला तर त्यांत नवल नाहीं. बायकी आवाज काढणारे जे जनानखां व फुटक्या मडक्यासारख्या थालिपीठ्या व रेकया आवाज काढणारे जे लंबकंठाशास्त्री त्या दोघांनांही प्रजा बिघडविण्याची सक्त मनाई असावी. नाकांतून गाणाऱ्या पारशी नाटक कंपन्या व ताणावर ताणा घेणाऱ्या मराठी नाटक कंपन्या संस्थानांत बिलकूल शिरकूं देऊं नये ह्यांच्या ऐवजीं पवाडे ह्मणणारे शाहीर, एकतारीवर भजन करणारे महार, गंभीर वीण्यावर व मर्दानी डफावर आलापणारे लावणीकार, ह्यांचा परामर्ष कदाचित् प्रजेला जास्त हितकर होईल. सगळ्यांत रणभेरी, रणतंबुर रणझांज वगैरे हत्यारें प्रजेकडून ऐकविल्यास व योजविल्यास, तिच्यांत मर्दानी बाणा उसळेल. रडकी गाणीं व किरटीं वाद्यें वाजविण्यास किंवा भिकार नाटकें पाहण्यास जेथील प्रजेला मुबलक वेळ आहे, तेथील प्रजा खुळी, परतंत्र, जनानी व झिंगलेली आहे असें खुशाल समजावें " अशा प्रकारची तेजस्वी वृत्ति तरुणांत निर्माण व्हावीं म्हणून गीतवाद्येंही बंद करूं ह्मणणारा पुरुष स्वतः भ्याडवृत्तीचा कसा असेल ? भीतीपेक्षां संशय त्यांच्या मनांत असे असें वाटतें. कांहीं असो. ही भ्याडवृत्ति दुसऱ्याच कांहीतरी प्रकारची,

म्हणजे उगीचच्या उगीच आततायीपणानें जीव धोक्यांत येऊं नये अशा तऱ्हेची असावी. कारण जगलें तर सर्व कामगिरी होणार आहे. महाभारतांत विश्वामित्र चांडालास म्हणतो 'जीवन्धर्ममवाप्नुयात्' आधीं जिवंत राहूं दे आणि मग परोपकार धर्म, करूं दे. व्यर्थ अताताथीपणानें जिवावर बेतूं नये म्हणून राजवाडे खबरदारी घेत असावेत. तो नामर्दी भित्रेपणा होता असें वाटत नाहीं.

राजवाडे हे वृत्तीनें साशंक असत. मनुष्याच्या बोलण्या-चालण्याचा त्यांना विश्वास वाटत नसे. मनुष्याच्या हेतूंबद्दल पुष्कळ वेळां ते विपर्यस्त बोलत. मोर्ले साहेबांनी जें म्हटलें आहे "It is not always safe to suppose the lowest motives to be the truest." दुसऱ्यांचे हेतु नेहमींच अशुद्ध समजणें हें चांगलें नाहीं. परंतु राजवाडे हे जगाकडे चांगल्या दृष्टीनें पहात नसत. कदाचित् जगाचा कटु अनुभव आला त्याचा हा परिणाम असेल. त्यांचा हा स्वभावविशेष दर्शविणाऱ्या गोष्टी प्रसिद्ध झाल्या आहेत. परंतु त्या गोष्टींचा मी उल्लेख करीत नाहीं. त्यांच्या स्वभावांत जनतेविषयीं साशंकता होती खरी. पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर पुढें पुढें कोणत्याही चळवळींत भाग घेत नसत व म्हणत 'माझा या देशांतील लोकांच्या शब्दांवर विश्वास नाहीं.' तसेंच राजवाडे यांचें झालें असेल.

वरील एकंदर लिहिण्यावरून राजवाडे यांच्या स्वभावाची अल्पस्वल्प शतांशानें तरी कल्पना वाचकांस होईल असें वाटतें.

## प्रकरण ८ वें



# अंत व उपसंहार.



काळाचा अजब तडाखा कोणास सुटला आहे ? मी मी म्हणणारा आशावादी काळानें तेव्हांच गिळंकृत केला जातो. तसेंच शेवटीं या महापुरुषाचें झालें. आपण शंभर वर्षे जगूं व शतायुर्वै पुरुषः हें श्रुतिवचन सार्थ करूं अशी राजवाडे यांस बालंबाल खात्री होती. परंतु परमेश्वर नेमानेम निराळेच होते. कार्य करणारा पुरुष आशेच्या व इच्छाशक्तीच्या जोरावर मृत्यूस दूर ढकलूं पाहात असतो, परंतु वास्तविक कोणासही मृत्यू दूर करतां येत नाहीं. त्याची वेळ झाली म्हणजे तो यावयाचा.

मरणाचे आधीं एक वर्ष दीड वर्ष आपणांस कांहीतरी विकार जडला आहे असें राजवाडे यांस वाटूं लागलें होतें. म्हणून तर पुण्यास राहण्याचें सोडून ते धुळ्यास आले. त्यावेळीं ते जरा खिन्न व चिंताक्रांत दिसले. आपले मित्र धुळ्याचे रा. भट यांस ते म्हणाले " तुम्ही सुग्रास अन्न जेवतां; परंतु आम्हांस असें सुग्रास अन्न कोठें मिळणार ? " कदाचित् याच उद्गारावरून बंगालचे जदुनाथ सरकार यांनीं राजवाडे हे पुनः लग्न करूं इच्छित होते असें लिहिण्याचें धाडस केलें असेल. सुतानें स्वर्गास जातां येतें

म्हणतात तें असें. जन्मभर ज्यानें स्वयंपाक केला त्यानें एखादे वेळीं आपल्या मित्रांजवळ असे उद्गार काढले म्हणजे त्याचें वैराग्य एकदम नष्ट झालें व तो सुखलोलुप बनला असें कोण विचारी मानील. परंतु कर्णोपकर्णी वार्ता ऐकून पराचा कावळा होतो व राईचा मेरू होतो त्यांतलेंच हें.

धुळ्यास आल्यावरही एकदम भयंकर वेदना मस्तकांत सुरू झाल्यामुळें ते नाशिक येथें गेले. तेथें डॉक्टरकडून तपासणी झाली व त्यांस बरें वाटूं लागलें व पुन्हां धुळ्यास ते आपलें आवडतें काम जोरानें सुरू करणार होते; परंतु मरण जवळच येत होतें. हें दुखणें वगैरे शेवटचींच चिन्हें होतीं.

मरावयाचे वेळेस राजवाडे धुळें येथें आले होते. धुळ्यावर राजवाड्यांचा फार लोभ. रामदासी संशोधनासाठीं त्यांनी ज्यांना स्फूर्ति दिली ते समर्थ सेवक शंकरराव देव याच धुळ्याचें भूषण. महाराष्ट्र धर्म हें सुंदर उद्बोधक पुस्तक लिहिणारे श्री. भट याच धुळ्याचे अलंकार. राजवाडे यांचें महत्त्व जाणणारे व त्यांस मानणारे येथें बरेच विद्वान् लोक. राजवाडे यांच्या संग्रहाचा बराच भाग धुळ्यास आहे. अशा या धुळें शहरींच आपला देह ठेवण्यास न कळत राजवाडे आले. त्यांची प्रकृति चांगली धडधाकट होती. धातुकोशाचें काम ते जोरानें सुरू करणार होते. रोज पांच सहा मैल फिरावयास जाण्याची त्यांची ताकद होती. परंतु न कळत मृत्यू जवळ जवळ येत होता. १९२६ डिसेंबरची २७ तारीख. त्या दिवशीं सोमवार होता. सोमवारीं राजवाडे यांची प्रकृति उत्तम होती. शंकरराव देव वगैरे मंडळी त्यांच्याजवळ बोलणें

चालणें करून गेली. मंगळवार उजाडला. सकाळीं ११॥ वाजतां ते जेवणास बसले—परंतु जेवण वगैरे राहिलेंच. त्यांना उलटी झाली; शौच्यासही लागली म्हणून ते जाऊं लागले; परंतु शक्ति नव्हती. क्षीणता एकाएकी आली व ते चौकांत पडले. नोकर बंगल्यांत झाडीत होता; तो आला. इतक्यांत हस्तलिखितें जीं मिळविलीं होतीं, त्यांची यादी करण्यास येणार निरसुरे मास्तर ते तेथें आले. त्यांनीं राजवाडे यांस उचलून आणलें व अंथरुणावर निजविलें. त्यांची नाडी मंद चालूं लागली होती; नाडींत क्षीणता आली होती. लसूण वगैरे अंगास चोळण्यांत आल्यावर ते शुद्धीवर आले व त्यांनीं विचारलें ' काय चोळतां ? डॉक्टरांस बोलविण्यास त्यांनीं सांगितलें. डॉक्टर आले व औषध वगैरे देण्यांत आलें. मंगळवारचा दिवस गेला व अमंगळ टळलें. बुधवारी एनेमा त्यांस देण्यांत आला. झोंपही चांगली स्वस्थ लागली. यामुळें गुरुवारीं त्यांस जास्त हुशारी व तरतरी वाटली. परंतु ही हुशारी मालवणाऱ्या दिव्याच्या वाढत्या ज्योतीप्रमाणें आहे, तुटणाऱ्या ताऱ्याच्या वृद्धिंगत तेजाप्रमाणें आहे हें आशातंतूवर जगणाऱ्या मनास समजलें नाहीं. आपण हा लोक सोडून जाणार ही राजवाडे यांस कल्पनाही नव्हती. इतर कोणासही राजवाडे लौकरच आपणास अंतरणार असें वाटलें नाहीं. शुक्रवार उजाडला. सकाळीं शौच्यास झालें. दोनदां दूध त्यांनीं मागून घेतलें. परंतु वेळ आली. ८॥ वाजतां कळ आली तीच शेवटची. कळ आल्यावर ते खोलींतून कचेरींत येऊं लागले तों पडले. पुनरपि डाक्टरांस बोलावणें गेलें—परंतु डॉक्टर येण्यापूर्वीच सर्व आटोपलें. श्री. शंकरराव देव

याचा पुतण्या दाजीबा यानें मरतांना मांडी दिली व त्या मांडीवर या देशार्थ तळमळणाऱ्या जीवानें १९२६ डिसेंबरच्या ३१ तारखेस शांतपणें प्राण सोडला. अशेचा मेरू उन्मळला. कर्तव्यनिष्ठेचा सागर आटला. उत्साहाचा सूर्य अस्तंगत झाला. महाराष्ट्र सरस्वती अनाथ झाली; महाराष्ट्र इतिहास पोरका झाला.

राजवाडे हे महापुरुष होते. विद्यारण्यांसारखे ते विद्येचे निस्सीम उपासक होते. परंतु त्यांचें सर्वांत मोठें कार्य म्हणजे महाराष्ट्रास ज्ञानप्रांतांत पुढें घुसण्यास त्यांनीं जागृति दिली. स्वदेशाचा इतिहास सांगून स्वदेशाची दिव्य व स्तव्य स्मृति प्रचलित केली. प्रख्यात महाराष्ट्रीय इतिहासकार सरदेसाई आपल्या पाटणा युनिव्हर्सिटीतर्फे दिलेल्या व्याख्यानांत राजवाडे यांचेसंबंधें जें गौरवानें बोलले त्याचा मी अनुवाद करितों. “ जनतेच्या मनांत ऐतिहासिक कागदपत्रांच्या संशोधनासंबंधींची तीव्र जागृति उत्पन्न करण्याचें काम राजवाडे यांनीं केलें. ही जागृति उत्पन्न करण्याचें सर्व श्रेय ह्या महापुरुषाला आहे. त्यांच्याजवळ साधन सामुग्री हे नव्हती. संपत्तीचा त्यांना पाठिंबा नव्हता. परंतु कॉलेजामधून बाहेर पडल्यावर या कार्योन्मुख पुरुषानें घरोघर भटकून, दारोदार हिंडून कागदपत्र संग्रह करण्याचें काम चालविलें. पुणें, सातारा, नाशिक वाई या मोठ्या शहरींच नव्हे तर लहानसान खेड्यापाड्यांपासूनही जुने सरदार, जुने उपाध्ये, जुने कारकून, जुने कुळकर्णी, देशपांडे यांच्या घरीं ते खेटे घालीत. कागदपत्रें जमा केल्यावर नितांत निष्ठेनें व एकाग्रतेनें त्या पत्रांची ते चिकित्सा करीत. असें करीत

असतां त्यांची तहानभूकही हरपून जावयाची. अल्प साधनसामुग्रीच्या जोरावर सर्व बृहन्महाराष्ट्रभर ते वणवण हिंडले व उरापोटावरून, खांद्याडोक्यावरून कागदपत्रांचीं पोतीं त्यांनीं वाहून आणिलीं. हा अफाट साधनसंग्रह महाराष्ट्रांत ठिकाठिकाणीं आपल्या मित्रांकडे ठेविला आहे. राजवाडे यांची निरपेक्ष कार्यभक्ति पाहून इतरही तरुणांस स्फूर्ति मिळाली व या खंद्या वीराच्या सभोंवती संशोधनाच्या समरांगणांत कार्य करण्यासाठीं तरुणांची मांदी मिळाली. राजवाडे हे संन्यस्तवृत्तीचे, त्यागाचे उत्कृष्ट आदर्श आहेत. मनुष्य एका कार्यास जीवेंभावें करून जर वाहून घेईल, तर तो किती आश्चर्यकारक कार्य करूं शकतो हें राजवाडे यांनीं स्वतःच्या उदाहरणानें दाखविलें आहे. अडचणी व संकटें, दारिद्र्य व सहानुभूतीचा अभाव वगैरे निरुत्साहकारी गोष्टींचें धुकें कार्यनिष्ठेच्या प्रज्वलित सूर्यप्रभेसमोर टिकत नाहीं.

राजवाडे हे केवळ संग्रहाकच नाहींत तर या संगृहीत साधनापासून किती महत्वाची माहिती मिळते व त्यापासून कसे महत्त्वाचे सिद्धांत स्थापन करतां येतात हें ते दाखवून देत. राजवाडे हे अर्थ शोधनाच्या शास्त्रांत प्रवीण झाले होते. समुद्रांत बुड्या मारून मोतीं आणणाऱ्या पाणबुड्यांप्रमाणें ते कागदपत्राच्या आगरांतून तत्त्व मौक्तिकें काढण्यांत तरबेज झाले होते. जें पत्र इतरांस क्षुल्लक वाटे, त्याच पत्रांतून नाना प्रकारची अभिनव माहिती राजवाड्यांची बुद्धि उकलून दाखवी. त्यांच्या बुद्धीजवळ मुकीं पत्रें हद्दतें बोलूं लागत. ३५० पानांचें २२ खंड कागदपत्रांनीं भरलेले त्यांनीं छापले व त्या खंडांस मार्मिक व

अभ्यसनीय अशा उद्बोधक प्रस्तावना लिहिल्या. जीं पत्रें त्या त्या खंडांतून छापलीं असत त्या पत्रांशींच त्या प्रस्तावनांचा संबंध असे असें नाहीं; तर कधीं कधीं इतिहास शास्त्रासंबंधीं नाना प्रकारचें विवेचन या प्रस्तावनांतून येई. इतिहास शास्त्राची व्याप्ति या शास्त्राचें महत्त्व, या शास्त्राचा उद्गम वगैरे संबंधीं उद्बोधक विवेचन त्यांच्या तत्त्व प्रचूर लेखणीतून येई.

राजवाडे यांनीं केवळ जुने कागद उजेडांत आणले आहेत एवढेंच त्यांचे कार्य नाहीं. तर त्या पत्रांतून निरनिराळ्या काळाचा व निरनिराळ्या अंगांचा महाराष्ट्रीय इतिहास त्यांनीं बनविला आहे. मानवी विचार व प्रगति, भाषाशास्त्र व मराठी भाषेची उत्पत्ति, सामाजिक व राजकीय भारतीय जीवनाचें स्वरूप, महाराष्ट्राच्या वसाहत कालचें विवेचन वगैरे विविध गोष्टींवर त्यांनीं आपल्या लेखांनीं अद्भुत प्रकाश पाडला आहे. नवीन अभ्यासानें त्यांच्या सिद्धांतांपैकीं कांहीं असत्य व भ्रामक ठरतील—तरीपण त्यांच्या लेखाच्या अभ्यासानें अभ्यासूस निःसंशय महत्त्वाची मदत होईल.

राजवाडे यांची व्यापक दृष्टि वेद काळापासून तों पेशवाईच्या अंतापर्यंत सारखीच स्वैर विहार करी. त्यांच्या लेखांतील त्यांची सर्वतोगामी विद्वत्ता व व्यापक गाढी बुद्धि पाहिली म्हणजे आपण चकित होतों, भांबावून जातों. कागदपत्र, ताम्रपट, शिलालेख वगैरे सर्व साधनांच्या साहाय्यानें ते इतिहास संशोधनास चालना देत. त्यांची बुद्धि कुशाग्र होती. पायाळू माणसास भूमिगत द्रव्य कोठें आहे हें जसें समजतें त्याप्रमाणें त्यांच्या बुद्धीस अचूक तत्त्वसंग्रह सांपडे. त्यांची तीक्ष्ण बुद्धि, निरतिशय कार्यश्रद्धा. निरुपम

स्वार्थत्याग–यांस महाराष्ट्रांत तोड नाही. सुखनिरपेक्षता व विलास-विन्मुखता, मानापमानाची बेफिकिरी या सर्व गुणसमुच्चयामुळें राजवाड्यांची कृतज्ञताबुद्धीनें महाराष्ट्रानें सदैव पूजा केली पाहिजे. ते ज्ञानसेवक होते; विद्येचे एकनिष्ठ उपासक होते. आयुष्यांत ज्ञानप्रसार व विचार प्रसार याशिवाय दुसरें कार्यच त्यांस नव्हतें. ' जोरदारपणा ' या एका शब्दांत त्यांचें वर्णन करणें शक्य आहे. त्यांचें मन जोरदार होतें; शरीर जोरदार होतें, त्यांची मतें जोरदार होतीं; त्यांचे सिद्धांत जोरदार असत; कागदपत्रांचे अर्थ उत्कृष्ट त्र्हेनें ते जसे फोड करून दाखवीत, त्याप्रमाणेंच जर ते अचूक मार्गदर्शक झाले असते, तर हिंदुस्थानांतील ऐतिहासिक ज्ञानक्षेत्रांत ते अद्वितीय मानले गेले असते. "

एका समव्यवसायी थोर विद्वानानें राजवाडे यांची केलेली ही स्तुति यथार्थ आहे. स्तुति करणाऱ्या पुरुषाच्याहि मनाचा निर्मळपणा पाहून समाधान वाटतें. नाहींतर समव्यवसायी लोक पुष्कळ वेळां मत्सरग्रस्त असतात; प्रांजलपणाचा त्यांच्याठायीं अभाव दृष्टीस पडतो. तसें सरदेसाई यांच्या बाबतींत झालें नाहीं ही आनंदाची गोष्ट आहे.

राजवाडे यांनीं इतिहासाचीं साधनें दिलीं; परंतु त्यांमधून सुसंबद्ध असा थोर महाराष्ट्राचा इतिहास निर्माण केला नाहीं. परंतु असा इतिहास लिहिण्याचें त्यांच्या मनांत कधीं कधीं येत असावें. एकदां ते म्हणाले " पेशवाईचा इतिहास लिहिण्याचीं साधनें सध्यां उपलब्ध आहेत; कोणातरी हुशार पदवीधरानें हें कार्य अंगावर घ्यावें. " शिवाजीचें चरित्र लिहा असें त्यांस कोणी

सांगितलें म्हणजे ते म्हणत ' अद्याप भरपूर माहिती हें चरित्र लिहिण्यास उपलब्ध नाहीं. ' राजवाडे हे इतिहासाचीं साधनें निर्माण करीत व ते अन्य मार्गांकडे वळत. नवीन नवीन ज्ञानक्षेत्रें लोकांच्या दृष्टीस दाखवावयाचीं, नवीन नवीन ज्ञानप्रातांत स्वतः शिरून लोकांस ' इकडे या, इकडे पहा केवढें कार्यक्षेत्र आहे ' असें सांगावयाचें—अशा प्रकारची त्यांची वृत्ति असे. साधनें निर्माण करून देणें हें मुख्य काम आहे. मग त्यांतून सुंदर इमारत निर्माण करणें तादृश कठीण नाहीं. साधन सामुग्रीच्या जोरावर राजवाडे यांस इतिहास लिहितांच आला नसता हें म्हणणें अयथार्थ आहे असें आम्हांस वाटतें. राधामाधव विलासचंपूच्या भव्य प्रस्तावनेंत १००—१२५ पानांत शहाजी राजांचा असा सुंदर व स्फूर्तिप्रद इतिहास त्यांनीं लिहिला आहे ! चिंतामणराव वैद्य यांनीं राधामाधव विलासचंपूच्या या प्रस्तावनेच्या परीक्षणांत लिहिलें होतें " राजवाडे यांच्या हातून मराठ्यांचा उत्कृष्ट इतिहास लिहिला जावो. " यावरून राजवाडे इतिहास लिहिण्यास लायक होते असेंच त्यांस वाटलें असावें. गिबनसारख्या इतिहासकारांप्रमाणें त्रिखंड विख्यात इतिहास लेखक त्यांसहि होतां आलें असतें. परंतु पात्रता होती एवढ्यावरून ते झाले असें मात्र कोणी ह्मणूं नये; तसें होणें त्यांस शक्य होतें हें मात्र खरें. इतिहासलेखकास मन शांत व निर्विकार पाहिजे ( Philosophic calm ) व तें राजवाडे यांच्या जवळ नव्हतें म्हणून त्यांस गिबनसारखें होतां आलेंच नसतें असें बंगालमधील सुप्रसिद्ध इतिहासलेखक जदुनाथ सरकार यांनीं लिहिलें. राजवाडे हे जरा पूर्वग्रह दूषित

असत हें खरें. त्यांची दृष्टि केवळ सरळच नव्हती, कधीं सरळहि असे; परंतु जदुनाथ यांस आदर्शभूत वाटणारा गिबन तो तरी पूर्व-ग्रहांपासून संपूर्णतः अलिप्त होता कां ? गिबनच्या रोमन साम्राज्याच्या इतिहसांतही पूर्वग्रह दूषित दृष्टि अनेक ठिकाणीं विद्वानांनीं दाखविली आहे. सारांश पूर्व ग्रहांपासून अलिप्त कोणीच नसतो.

राजवाडे यांचें कार्यक्षेत्र एकच नसे, म्हणून त्यांनीं इतिहास लिहिला नाहीं. जगते तर कदाचित लिहितेहि. निरनिराळीं कार्य-क्षेत्रें उघडीं करणें व समाजाच्या बुद्धिमत्तेला निरनिराळ्या अंगांनीं कामें करण्यास लावणें त्यांचा व्याप व पसारा वाढण्यास वाव देणें हें त्यांचें कार्य होतें. भाषा, व्याकरण, इतिहास, समाजशास्त्र सर्वत्र ते अनिरुद्ध संचार करीत, यांतील तात्पर्य हेंच होय. म्हणूनच डॉ. केतकर म्हणतात " एका क्षेत्राचा अभ्यास करून तें टाकून दुसरें क्षेत्र घ्यावें ही राजवाडे यांची वृत्ति होती पण ती ' Jack of all trades & master of none ' एक ना धड, भाराभर चिंध्या ' यासारखी नव्हती. तर त्या वृत्तीचीं कारणें फार खोल होतीं. त्यांच्याशी गप्पा मारतांना त्यांच्यांत एका गोष्टीची जाणीव दिसे, व ती जाणीव म्हटली म्हणजे आपणच राष्ट्रविकासाच्या भावनेनें कामांत पडलेले पहिले संशोधक आहोंत ही होय. महाराष्ट्राच्या बुद्धीस सर्व प्रकारें चालना देण्यासाठीं, त्यांनीं अनेक क्षेत्रांत संशोधन स्वतः आपल्या अंगावर घेतलें असावें; आणि ज्या प्रकारच्या संशोधनामध्यें किंवा ज्या विषयामध्यें पारगंतता मिळविली, त्या क्षेत्रांतच कार्य न करतां त्या क्षेत्राचाहि त्याग करावयास त्यांचें मन तयार झालें असावें. राजवाडे हे आपल्या आयुष्याकडे इतिहाससंशोधक या नात्यानें

पाहात नसून संस्कृति विकास प्रवर्तक ( संस्कृतीच्या निरनिराळ्या अंगांचा विकास करण्याच्या मार्गांत स्वतः जाणारे व लोकांस नेणारे ) या नात्यानें पाहात आणि त्यांची खरी किंमत ओळखणाऱ्यानें त्यांच्या आयुष्याचें याच दृष्टीनें अवगमन केलें पाहिजे. " डॉ. केतकर यांचें हें राजवाड्यांच्या कार्यासंबंधींचें विवेचन फार महत्त्वाचें आहे व ही दृष्टि घेऊन आपण राजवाड्यांकडे पाहिले म्हणजे त्यांनीं गिबनप्रमाणें इतिहास कां लिहिले नाहींत वगैरे प्रश्नांचें मार्मिक उत्तर मिळतें.

असा हा धगधगीत ज्ञानवैराग्याचा तेजःपुंज पुतळा महाराष्ट्रास मोठ्या भाग्यानें मिळाला. प्रो. भानु म्हणतात ' राजवाडे यानीं समर्थ ही पदवी पुन्हां नव्यानें भूषविली. ' प्रो. पोतदार म्हणतात.

" पुरतें कोणाकडे पाहेना । पुर्तें कोणाशीं बोलेना
पुरतें एकें स्थळीं राहीना । उठोनि जातो ॥
जातें स्थळ सांगेना । सांगितलें तरी तेथें जायेना
आपुली स्थिति अनुमाना । येवोंच नेदी ॥

ही निःस्पृहाची समर्थांनीं सांगितलेली शिकवणुक राजवाडे यांच्या चरित्रांत पदोपदीं प्रत्ययास येई. परंतु ' सगट लोकांचा जिव्हाळा । मोडूंच नये ' हा उत्तरार्ध समर्थांनीं निःस्पृह राहूनही जसा गिरविला तसा राजवाडे यांस गिरवितां न आल्यामुळें ' बहुतांचें मनोगत ' त्यांस हातीं घेतां आलें नाहीं ; "महंतीची कला पूर्णपणें त्यांस साधली नाहीं. " देशकार्य करावयास, इतके परकी सत्तेनें गांजले आहेत, तरी लोक तयार होत नाहींत म्हणून हा महापुरुष सारखा धुमसत असे. त्यांच्या सर्व कार्यांत देशाभिमानाचें

सोनेरी सूत्र कसें ओतप्रोत भरलेलें आहे हें मागील एका प्रकरणांत दाखविलें आहे. त्यांचा देशाभिमान पराकाष्ठेचा होता. देशाभिमानास कमीपणा आणणारें एकहि कृत्य त्यांनीं केलें नाहीं. आचार, विचार व उच्चार तिहींनीं ते देशभक्त होते. आमरण स्वदेशीचें व्रत त्यांनीं पाळलें. कधींही या व्रताचा त्यांनीं परित्याग केला नाहीं. २५।२६ वर्षांचे असतां पत्नी वारली, तेव्हां ' पुरुष अगर स्त्री—यांस दुसऱ्यांदा लग्न करण्यास हक्क नाहीं- शेष भागीदारानें संन्यस्तवृत्तीनें देशसेवा वा देवसेवा शक्त्यनुसार करून शेष आयुष्य घालवावें ' हे धीरोदात्त उद्गार त्यांनीं काढले व प्रपंचाच्या भानगडींत कदापि पडले नाहींत; व सर्वजन्म देशाची निरनिराळ्या मार्गांनीं सेवा करण्यांत घालविला. देशाकरितां सर्वस्वाचा त्यांनीं होम केला होता. देशहितास विघातक अशा सर्व वस्तूंशीं त्यांनीं असहकार केला होता. महात्मा गांधीच्या संबंधानें राजवाडे आदरयुक्त बोलत व ह्मणत " असहकार हाच उपाय राष्ट्राच्या तरणोपायास आहे" हा असहकार त्यांनीं जन्मभर चालविला. चिंतामण गणेश कर्वे विद्यासेवकांत लिहितात " राजवाड्यांच्या इतकी कडकडीत देशसेवा दुसऱ्या कोणी केल्याचें माहीत नाहीं. देशाकरितां फकिरी जर कोणी घेतली असेल तर ती राजवाड्यांनींच. गत महाराष्ट्रवीरांचा त्यांना किती अभिमान होता हें ते रोज स्नानसंध्येनंतर पितृतर्पणप्रसंगीं शिवाजी व थोरले माधवराव यांना उदक देत यावरून सिद्ध होईल. खरा निःस्वार्थ व निःस्पृहपणा पाहावयाचा असेल तर तो राजवाड्यांच्याच ठिकाणीं दिसेल. इतर देशभक्त निःस्वार्थपणाच्या निरनिराळ्या पायरीवर सोयीनें उभे राहलेले आढ-

ळतील. या निर्भेळ निःस्वार्थामुळेंच त्यांच्यांत विक्षिप्तपणा दिसून येई; व तो क्षम्यहि होई. एकंदरींत आजपर्यंतच्या इंग्रजी अमदानींत राजवाड्यांसारखा पुरुष झाला नाहीं हें खास ''

गेल्या दोन तीन वर्षांत महाराष्ट्रांतील नामांकित इतिहाससेवक सर्व जात चालले. वासुदेवशास्त्री खरे, पारसनीस, महाराष्ट्र सारस्वतकार भावे, राजवाडे व साने सर्व दिवंगत झाले न्या. रानडे यांनीं मराठी इतिहासांचें आध्यात्मिक स्वरूप दाखवून दिलें व महाराष्ट्रीय इतिहासाचा मोठेपणा प्रतिष्ठापिला त्यांच्यानंतर या पंच पांडवांनीं महाराष्ट्रीय इतिहासाची बहुमोल कामगिरी केली व या सर्वांच्या कामगिरीमध्यें राजवाडे यांची कामगिरी शिरोधार्य आहे. या पांचहि जणांत अर्जुनाप्रमाणें पराक्रम राजवाडयांनींच गाजविला; वासुदेव शास्त्री खरे यांचें कार्यक्षेत्र मर्यादित होतें म्हणून त्यांचीं कामगिरी व्यवस्थित आहे व खुलून दिसते; भावे व पारसनीस यांस द्रव्याची ददात नव्हती व थोरामोठ्यांशीं त्यांच्या दोस्ती होत्या. साने यांचें कार्यहि मर्यादितच स्वरूपाचें होतें, परंतु ठाकठिकीचें होतें. राजवाडे यांचेंच कार्य अफाट होतें. शतमुखी गंगेप्रमाणें त्यांची कामगिरी शतमुख होती. आणि हें सर्व राजेरजवाडे, सरकार व जनता यांची हांजी हांजी न करतां, त्यांचा आश्रय नसतां, स्वतःच्या हिमायतीनें केलें, म्हणून हें कार्य थोर आहे.

परंतु मोठ्या दुःखाची गोष्ट ही कीं राजवाडे हयात असतां या पुण्यभूमींत, आनंदवनभुवनीं त्यांची ती धिप्पाड व तेजस्वी मूर्ति भ्रमण करीत असतां, तिचें महत्त्व लोकांस समजलें नाहीं. त्यांची महती, त्यांची महती फारच थोड्यांस आकलन करितां आली.

परंतु त्यांच्या मरणानंतर एकदम केवढा खळगा पडला हें दिसून आल्यामुळें महाराष्ट्र जनता दुःखांत बुडाली. स्विफ्टच्या मरणानंतर एकानें म्हटलें ' Oh what a fall it was, it was like the fall of the Roman Empire '- त्याप्रमाणेंच राजवाड्यांच्या मरणासंबंधें महाराष्ट्रास वाटलें. त्यांच्या मरणानें सर्वांसच धक्का बसला. पुष्कळ वेळां असेंच होतें. मनुष्याचा अंगचा मोठेपणा व त्याची थोरवी त्याच्या मरणानंतरच समजून येते. फूल कुसकरल्यावरच त्याचा सुगंध सर्वत्र दरवळतो. जिवंत असतां राजवाडे यांचें महत्त्व कळलें नाहीं—परंतु मेल्यावर त्यांचें महत्त्व, त्यांचें मोल सर्वांस कळून आलें. आतां तरी महाराष्ट्रानें या पुण्यपुरुषास, या लोकोत्तर ईश्वरी देण्याच्या पुरुषास आपल्या हृदयकमलांतून दूर करूं नये. त्यांची संपूज्य स्मृति सदैव प्रज्वलित ठेवून त्यांच्याप्रमाणें निःस्वार्थतेनें, कार्यनिष्ठेनें कार्य करण्यास पुढें यावें. निरनिराळ्या शास्त्रांत पारंगतता मिळवून पाश्चात्यांचा वरचढपणा दूर करावा व भारतवर्ष ज्ञानाचें पुनरपि माहेरघर करावें म्हणजेच राजवाडे यांच्या तळमळणाऱ्या आत्म्यास शांति मिळेल, एरव्हीं नाहीं.

**समाप्त.**

# शुद्धिपत्र.



| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५ | १० | मुडके | फडके |
| ७ | १५ | त्या त्या | त्या या |
| १२ | ७ | दुर्दैव | दुर्दैव |
| १५ | ६ | Time | Line |
| १६ | ३ | कृति | वृत्ति |
| ,, | ७ | वागीश्वरांनी | वागीश्वरांनीं |
| ,, | ८ | आमृतासमान | अमृतासमान |
| २६ | ३ | चीत | चकित |
| ४२ | १८ | शास्त्रहा | शास्त्रज्ञ |
| ४३ | ७ | शास्त्रही | शास्त्रज्ञ |
| ,, | २३ | निगंत | तिगंत |
| ४४ | ८ | रादैव | रादैच् |
| ४६ | ६ | नैसक्तिक | नैरुक्तिक |
| ४८ | ७ | वाङ्ममय | वाङमय |
| ४९ | १० | शास्त्रयानेंच | शास्त्रयाचेंच |
| ,, | १२ | शारीशास्त्र | शारिरशास्त्र |
| ५० | ४ | उपकर्षा | अपकर्षा |
| ,, | ५ | अभ्यासनीय | अभ्यसनीय |

| | | | |
|---|---|---|---|
| ५१ | १० | एकाट्या | एकांड्या |
| ,, | ११ | राधमाधाव,विलासचंपू | राधामाधवविलासचंपू |
| ,, | १७ | वगैरे | बडोदें |
| ५२ | २ | झालो | झोला |
| ५७ | १२ | अडणार | आढळणार |
| ५८ | ३ | त्यांत | त्यांस |
| ५८ | २१ | प्रतिपक्षी यांची | प्रतिपक्षीयांची |
| ५९ | ३ | त्यांची भाषा | त्यांच्या भाषेचें |
| ,, | २० | ही | हीं |
| ,, | २१ | विश्वसाचा | विश्वासाचा |
| ६० | २ | वर्णणीय | वर्गनीय |
| ,, | ३ | मग्दुग | मद्गुग |
| ६२ | ३ | मंडळांवर | मंडळांशी |
| ६३ | २ | हा | मनुष्य हा |
| ६५ | १४ | आहेत | आहे |
| ६६ | २१ | शूद्र | क्षुद्र |
| ६७ | ८ | सतांची | संतांची |
| ६८ | २१ | उद्बोदक | उद्बोधक |
| ७० | १५ | उब्दोधक | उद्बोधक |
| ७१ | ३ | त्यांज्या | त्यांच्या |
| ७२ | २० | भारतीयांच्या शब्दालाहि | भारतीयांच्याहि शब्दाला |
| ७५ | १५ | यांतील | या तीन |

| | | | |
|---|---|---|---|
| ७८ | ६ | स्वच्छताच हा | स्वच्छता हाच |
| ८९ | ८ | उद्धेक | उद्रेक |
| ९० | ३ | नास्तिपणा | नास्तिकपणा |
| ९१ | २२ | रोजरोज | दररोज |
| ९२ | १२ | कुंपणावरून | कुंपणाजवळून |
| ९४ | ३ | मपाम्रयात् | मत्रामुयात् |
| ,, | ५ | अतातायी | आततायी |
| ,, | १० | Snppose | Suppose |
| ९५ | ५ | परमेश्वर | परमेश्वरी |
| १०२ | १२ | असा | कसा |

# अभिनवग्रंथमालेचीं पुस्तकें.

**अमेरिकापथदर्शक** ( दुसरी आवृत्ति ) **किंमत आठ आणे.**

जवळ फक्त १९ रु. असतांना अमेरिकेस जाण्याचा निश्चय करून व अनेक प्रकारच्या हाल अपेष्टा सोसून **स्वामी सत्यदेव** अमेरिकेस कसे पोहोंचले याची माहिती प्रथम देऊन नंतर अमेरिकेस जाणारे विद्यार्थी, प्रवाशी अगर व्यापारी यांना उपयुक्त अशा अनेक मार्मिक सूचना प्रश्नोत्तररूपानें केल्या आहेत. अमेरिकेंतील शिक्षणाच्या सोयी, तेथील खाणेंपिणें, वागणूक वगैरे संबंधीच्या विवेचनाबरोबरच अमेरिकाप्रवेशाचे नियम व अमेरिकेचे आगबोटीचे दरहि यांत दिले आहेत. मध्यप्रांत, वऱ्हाड, मुंबई व बडोदें विद्याखात्याकडून शाळांतील लायब्ऱ्याकरितां व बक्षीसाकरितां मंजूर. पृष्ठसंख्या १००.

**२ अमेरिका दिग्दर्शन. किंमत १ रुपया.**

अमेरिकेंत उदंड संचार करून स्वामी सत्यदेवांनीं जी माहिती मिळविली ती त्यांनीं या पुस्तकांत समाविष्ट केली आहे. पैशाशिवाय काढलेली शिकागोतील पहिली रात्र, अमेरिकेंतील स्त्रिया, मिस पार्करची शाळा, शेतावरील कांहीं दिवस, विद्यार्थ्यांचा जीवनक्रम वगैरे प्रकरणें वाचकांचीं मनें आपल्याकडे आकर्षून घेतात. आपल्याकडील मालकांची मजुरांशीं वागणूक, आपल्याकडील शाळा व अमेरिकेंतील शाळा, आपल्याकडील विद्यार्थी व अमेरिकेंतील विद्यार्थी ह्यांची तुलना करून विवेचन करण्यांत आल्यामुळें देशहितेच्छु प्रत्येक वाचकानें हें पुस्तक एकदां तरी अवश्य वाचावेंच, अमेरिकेच्या

शासनपद्धतीची उपयुक्त माहितीहि सुबोध भाषेत शेवटीं दिली आहे. मध्यप्रांत, वऱ्हाड विद्याखात्याकडून हें पुस्तक वाचनलयांकरितां व बक्षिसांकरितां मंजूर करण्यांत आलें असून इंदूरच्या ग्रंथोत्तेजक मंडळाकडून यास बक्षिस मिळालें आहे. पृ. सं. १७५.

**३ राजर्षिभीष्म** ( दुसरी आवृत्ति ) **किंमत ५ आणे.**

महाभारतांतील श्रेष्ठ पर्वे अनुशासन व शासनपर्व यांत भीष्माचार्यांनीं सर्वांस उपदेश केला आहे. अशा प्रकारचा उपदेश करण्याचा अधिकार ज्यांस प्राप्त झाला त्यांचें चरित्रहि तसेंच उज्वल असलें पाहिजे यांत शंका नाहीं. लहान मुलांनाहि समजेल अशा सोप्या भाषेत हें पुस्तक लिहिलें आहे. मध्यप्रांत वऱ्हाड व मुंबई विद्याखात्यांकडून हें पुस्तक बक्षिसार्थ व लायब्ररींयांकरितां मंजूर झालें असून गीताधर्म मंडळाच्या मध्यम परीक्षेसाठीं हें पुस्तक नेमण्यांत आलें आहे. पृ सं ६९.

**४ मानवी अधिकार किंमत सहा आणे—**

प्रत्येक मनुष्य अधिकारप्रिय आहे. पण जसे मला हक्क पाहिजेत तसे दुसऱ्यांनाहि पाहिजेत. तेव्हां त्यांच्या हक्कांस जर मी मान देईन तर माझे हक्क ते केव्हांहि मानतील ही जाणीव फारच थोड्या लोकांत असते. प्रत्येकाचे जन्मसिद्ध हक्क कोणते, कोणाचे हक्क कोणी पायाखालीं तुडविले आहेत आणि कोणत्या कारणास्तव समाजांत एकी घडून येत नाहीं व त्याकरितां प्रत्येकानें आपल्या वागणुकींत कशी सुधारणा घडवून आणली पाहिजे याचा उहापोह या पुस्तकांत करण्यांत आला आहे. मध्यप्रांत वऱ्हाड व मुंबई विद्याखात्यांकडून हें पुस्तक लायब्ररींयांकरितां व बक्षिसाकरितां मंजूर

झालें असून इंदूरच्या महाग्रंथोत्तेजक मंडळाकडून याम बक्षीम मिळालें आहे. पृ. सं. ९०.

**५ हिंदूसंघटनेचा बिगुल. किंमत १२ आणे —**

बुद्धिवाद व राष्ट्रधर्म यानुसार केलेलें संघटन हेंच खरें संघटन होय हें तत्व लक्षांत घेऊनच स्वामी सत्यदेवांनीं हें ओजस्वी पुस्तक लिहिलें आहे. निरनिराळ्या काळीं संघटनेप्रीत्यर्थ कोणते प्रयत्न झाले, हल्लीं 'स्वराज्य' संपादनार्थ संघटनेची आवश्यकता कशी आहे हें पुस्तकाच्या प्रथम खंडांत सांगितलें आहे. सामाजिक क्रांति हें संघटनेचें एक साधन असल्यानें स्पृश्यास्पृश्य, जातिभेद, क्षात्रधर्म प्रसार, विधवा विवाह, अस्पृश्योद्धार, राष्ट्रीय सण, देवळें व साधु इत्यादि बाबतींत सुधारणा कशी घडून यावयास पाहिजे याचें विशदीकरण द्वितीय खंडांत केलें आहे. तिसऱ्या खंडांत युरोपीय संघटन, इस्लामी संघटन, बौद्ध संघटन यांचा विचार करून हिंदुस्थानांत राष्ट्रीय संघटन कसें घडून यावयास पाहिजे याचा विचार केला आहे. चौथ्या खंडांत हिंदु संघटनेप्रीत्यर्थ मुसलमान, ख्रिश्चन शीख वगैरे समाजांनीं कोणतीं: कर्तव्यें बजावलीं पाहिजेत हें सांगून शुद्धीची आवश्यकता कशी आहे हें स्पष्ट करून दाखविलें आहे. पुस्तकांत एकंदर ३६ प्रकरणें असून मुखपृष्ठावर स्वामी सत्यदेव यांचें छायाचित्र दिलें आहे. फारच थोडक्या प्रती शिल्लक आहेत. पृ. सं. २००

**६ आदर्शशिक्षण. किंमत. ६ आणे —**

देशाचे उत्तम नागरीक:होण्यास उत्तम शिक्षणाची आवश्यकता असते. ज्या शिक्षणामुळें शारीरिक, आर्थिक, मानसिक व आत्मिक स्वातंत्र्य प्राप्त होऊं शकेल तेंच आदर्श शिक्षण होय. प्रचलित

पाश्चात्य शिक्षण पद्धतींतील दोष दाखवून वरील प्रकारच्या आदर्श शिक्षणाचें स्वरूप स्वामी सत्यदेवांनीं या पुस्तकांत विशद करून दाखविलें आहे. हें पुस्तक वाचून एक सद्गृहस्थ इतके खूष झाले कीं, आनंदाच्या भरांत त्यांनी स्वामींच्या हातावर एक १०० रु. ची नोट ठेविली! मध्यप्रांत वऱ्हाड विद्याखात्याकडून बक्षिसार्थ व लायब्रऱ्यांकरितां मंजूर. पृ. सं, ९०.

**७ क. इतिहासाचार्य राजवाडे चरित्र, किंमत १० आणे.**

इतिहाससंशोधक वि. का. राजवाडे यांचें नांव माहित नाहीं असा एकहि महाराष्ट्रीय असूं शकणार नाहीं. सूक्ष्म विवेचक बुद्धिमत्ता, अगाध विद्वत्ता, साधी सरळ राहणी, निगर्वी पण स्वाभिमानी स्वभाव, अंगीकृत कार्यावरील अढळ निष्ठा, कणखर शरीरयष्टि, निःस्पृह वाणी, इत्यादि गुण त्यांच्या ठिकाणीं वास करीत होते. त्यांचें चरित्र तरुण पिढीस बोधप्रद व अनुकरणीय आहे यांत शंका नाहीं. हें चरित्र लिहिण्याचें काम के. ना. गोखले चरित्र व ईश्वरचंद्र विद्यासागर या पुस्तकांचे विद्वान् लेखक श्री. पांडुरंग सदाशिव साने, एम्. ए. यांनीं केलें आहे. पृष्ठ संख्या १२०

**८ वेदांताचा विजयमंत्र व इतर निबंध किं. ६ आ.** (छापत आहे.)

या पुस्तकांत स्वामी सत्यदेवांच्या वेदांताचा विजयमंत्र राष्ट्रीयत्व, गतानुगातिक पारतंत्र्याची मीमांसा व हिंदीचा संदेश, या चार बोधप्रद व स्फुर्तिदायक निबंधाचा समावेश करण्यांत आला आहे. निबंधाच्या नांवावरूनच पुस्तकांतील प्रतिपाद्य विषयाची कल्पना येणार आहे.

९–१० शासनसंस्था भाग १ व २ ( छापत आहे. )

१ ल्या भागांत ग्रेटब्रिटन, अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें, फ्रान्स प्रजासत्ताक जर्मनी, जपान, स्विट्झर्लंड, समाजसत्तावादी रशिया व हिंदुस्थान या आठ देशांच्या शासन पद्धतींची माहिती देण्यांत आली आहे. दुसऱ्या भागांत शासन पद्धतींचें स्वरूप, कायदेकारी-सत्ता, कार्यकारी सत्ता, न्यायदान सत्ता, स्थानिक राज्यकारभार, मतदान व मतदारसंघ आणि व्यक्तिस्वातंत्र्य व सरकारची कर्तव्यकर्में या विषयांची चर्चा सुबोधरीत्या करण्यांत आली आहे. राजकारण शास्त्राचा पद्धतशीर अभ्यास करण्यास या प्रकारचें मराठीतील हें पाहिलेंच पुस्तक आहे. पृष्ठ संख्या सुमारें २५०

